


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १९ वे ] नोव्हेंबर १९६५ [ अंक २



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.












अनुक्रमणिका

नवभारत मासिकाच्या

जाहिरातदारास

सर्व ग्राहकास व हितचिंतकास

## ही दीपावली व नूतन वर्ष

सुखाचे व समृद्धीचे जावो !






अनुक्रमणिका





प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

# नवभारत

वर्ष एकोणिसावे | नोव्हेंबर

अंक दुसरा | १९६५

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ | सहामाही रु. ५ | अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ' नवभारत ' मासिक,
' गणेश भुवन ' २७६, तेलंग रोड, माटुंगा-मुंबई १९
२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )
३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २
फोन नं. २३५५४

श्री. य. त्र्यं. प्रधान

# ' शब्दसृष्टीचे ईश्वर '

कोणत्याही वाङ्मयासंबंधी लिहिण्यापूर्वी मानवी-जीवनामध्ये ' शब्दाला ' काय स्थान आहे याचा विचार केल्यास वाङ्मयाच्या मूल्यमापनाच्या कसोटया-संबंधीच्या आपल्या दृष्टिकोनात आमूलाग्र फरक पडल्याचे आपणास आढळून येते. साहित्यिकांना आपण ' शब्द-सृष्टीचे ईश्वर ' म्हणतो. त्या ' शब्दा ' संबंधी जितका विचार व्हावयास पाहिजे तितका विचार, गेल्या पन्नास वर्षांत तरी पू. साने गुरुजीं-सारखे एकदोन अपवाद वगळता कुणी साहित्यिकाने केल्याचे दिसत नाही.

' शब्द ' जर मानवाला लाभला नसता तर पशू आणि मनुष्य यात काही भेद करता आला नसता. उत्क्रांति-वादाची परिभाषा घटकाभर वापरून असे म्हणता येईल की, पशुयोनीतून जेव्हा मनुष्यजात उत्क्रांत झाली तेव्हा ती ' शब्दा ' मुळेच. ' शब्द-शक्तीच्या ' सामर्थ्यामुळेच पशूपासून सध्याच्या प्रगत मानवाच्या अवस्थेपर्यंत उत्क्रांति होऊ शकली. ' शब्द ' हे एकच असे लक्षण स्पष्टपणे दिसते की ज्यामुळे पशुजाती व मनुष्य-जाती यातील भेद लक्षात येतो. ग्रिन-शेपटाच्या माकडांना ' शब्दाच्या ' साहाय्याविना कधीच मनुष्य बनता आले नसते, असे खात्रीपूर्वक विधान करता येते. तेव्हा ही जी ' शब्द-शक्ती ', मानवाला प्राप्त झाली आहे तिच्या ' स्वरूपाचा ' विचार केल्यास मानवासंबंधीच्या आपल्या ज्ञानात निश्चित भर पडेल.

वनस्पति सृष्टी, पशुपक्षादिक प्राणी यांच्या शरीर-रचनेचा अभ्यास केला असता, एक गोष्ट ठळकपणे लक्षात येते की, प्रत्येकात ' जीवधर्म ' हा ' समान धर्म ' असला तरी त्यांचा ' जीवनक्रम ' ( Life-History ) हा त्यांच्या अंतर्गत शरीर-रचनेशी निगडित आहे. पक्षांना पंख नसते तर त्यांचे जीवन वेगळे झाले असते, झाडे चालू शकत नाहीत, किंवा पशू उडत नाहीत याचे कारण त्यांची अंतर्गत ' शरीर-रचना '. माशाच्या विशिष्ट शरीर-रचनेमुळे तो ' जलचर ' झाला आहे. प्रत्येक प्राणिजातीचा ' जीवनक्रम ', ' जीवनाचे स्वरूप ' व त्याच्या शरीरातील अंतर्गत रचना यांचा अविभाज्य संबंध असल्याचे आढळून येते. सर्वच शरीर-रचनेच्या आधीन आहेत.

**शब्दशक्तीचे मर्म**

मानवाला जी ' शब्द-शक्ति ' लाभली आहे त्या ' शब्द-शक्तीच्या स्वरूपावरच ' मानवाचे जीवन अवलंबून राहील असाच निष्कर्ष कुणीही काढील. मनुष्याच्या शरीर-रचनेचा जर अभ्यास केला तर, पशूपासून वेगळेपणा ज्या ' शब्द-शक्तीने ' मनुष्याला प्राप्त करून दिला आहे त्या ' शब्द-शक्तीच्या ' संगोपनासाठी- संवर्धनासाठी- आविष्कारासाठीच मानवी शरीराची यंत्रणा राबत असल्याचे आढळून येईल. ह्या ' शब्द-शक्तीचे स्वरूप ' काय आहे. यासंबंधी दोन मते प्रचलित आहेत.

( १ ) ' शब्द-शक्ति ' हे पंचज्ञानेंद्रियजन्य सुख वृद्धिंगत करण्यासाठी निसर्गाने निर्माण केलेले साधन आहे.

( २ ) 'शब्द-शक्ति' ही इतकी मर्यादित स्वरूपाची शक्ती नसून ' ही शक्ति ' ' शरीरसुखाच्या ' मर्यादा ओलांडून ' शब्दाने निर्देशिल्या जाणाऱ्या प्रत्येक वस्तूचे यथार्थ स्वरूप ' जाणून घेण्याची धडपड करीत असताना दिसून येते. कुणाला याची जाणीव असते, कुणाला असत नाही एवढाच फरक. मात्र यामुळे ' शब्द-शक्तीच्या ' ' स्वभावामध्ये ' काहीच फरक पडत नाही.

**मनुष्य आणि प्राणी यांतील फरक**

माणसाने शिकविलेल्या काही शब्दांचा उच्चार करू शकणारा पोपट त्या ' शब्दोच्चाराने ' दर्शविल्या जाणाऱ्या वस्तूच्या ' यथार्थ स्वरूपाची ' ओळख करून घेण्याची धडपड करीत आहे असे आजपर्यंत तरी आढळून आले नाही. चेंडू-फळी वा काठी यासारख्या हत्यारांचा उपयोग करावयास शिकविलेल्या माक-डाची धडपड ही वस्तूच्या काही अंशापर्यंतच मर्यादित राहते. शास्त्रज्ञानी शिकविलेल्या उपयोगा-खेरीज त्या वस्तूचे काही अधिक ज्ञान होण्याची शक्यता आहे, अशी खटपट करण्याचा प्रयत्न माकडे करीत असल्याचे आढळून येत नाही.








तेव्हा माणूस, पोपट व माकड यात हा फरक आढळून येतो की, मनुष्य हा शब्दाचा उच्चार करतो, उपयोग करतो, शब्दाने निर्देशिल्या जाणाऱ्या वस्तूचे 'यथार्थ ज्ञान' मिळविण्याची अविरत धडपड करीत राहतो. यातच मानवाच्या 'मनुष्यत्वाचे' रहस्य दडलेले आहे. मानवी जीवनातील प्रत्येक श्वासोच्छ्वासागणिक मानव आपल्या 'मनात येणारे' शब्द, त्यानी निर्देशिल्या जाणाऱ्या 'वस्तू' यांचे यथार्थज्ञान मिळविण्याची धडपड करीत असताना दिसतो. मनुष्याचे कोणतेही कार्यक्षेत्र असो, कला असो, शास्त्र असो, शेती असो, कारखानदारी असो, जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात मनुष्यमात्र त्या त्या क्षेत्रात येणाऱ्या 'शब्द-निर्देशित' वस्तूंचे 'यथार्थज्ञान' मिळविण्याची धडपड करीत असल्याचे आढळून येईल.

हा जो मनुष्यमात्राचा 'स्वभाव' आहे. त्याला डावलून जीवन जगता येत नाही, जसे पाण्याशिवाय जलचर जगू शकत नाहीत. मनुष्यमात्र या 'स्वभावाचाच' आविष्कार प्रत्येक क्षणी करीत असतो. 'शब्द-निर्देशित' वस्तूच्या यथार्थज्ञानाची झेप व्यक्तीप्रमाणे भिन्न राहते हे खरे; परंतु वस्तूचे, 'दृश्य स्वरूप' व त्याचे काही 'उपयोग' यावर माणसाचे समाधान होत नाही. वस्तूचे यथार्थ स्वरूप जाणण्यासाठी स्थूलाकडून सूक्ष्माकडे, दृश्याकडून अदृश्याकडेही जाण्याचा प्रयत्न मनुष्य करतो.

साहित्यिकसुद्धा स्त्री, पुरुष, शरीरसौष्ठव, सौंदर्य, प्रेम, स्त्री-पुरुष संयोग या 'वस्तूंचे' वर्णन करून संतुष्ट होत नाहीत. ते सुद्धा दृश्य जगाच्या आड असलेल्या मानवी मनाच्या स्वरूपाचा शोध घेण्याचा प्रयत्न करताना दिसतात.

वनस्पति-शास्त्राचा अभ्यास करू इच्छिणाऱ्या विद्यार्थ्याने वनस्पति-शास्त्र विषयक शब्दांचे कोश पाठ केले, पदार्थविज्ञान शास्त्र, रसायन शास्त्र इत्यादी शास्त्रांचा अभ्यास केला, तरी त्याला वनस्पतिशास्त्राचे ज्ञान होणार नाही. या शास्त्रांचा वनस्पति-शास्त्राशी संबंध असला तरी दूरान्वयाने आहे. साक्षात्-संबंध नाही. तसेच प्रत्येक वस्तूच्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान करून घ्यावयाचे असले की, हा प्रश्न उभा राहतो की, साक्षात्-ज्ञान कोणते ? दूरान्वयाने मिळणारे ज्ञान कोणते ? साक्षात्-ज्ञान मिळविण्याचा मार्ग सांपडला तर, सत्यस्वरूप समजेल आणि वेळही वाचेल.

कित्येकवेळा असाही विचार येतो की, प्रत्येक वस्तूंचे यथार्थ स्वरूप जाणून घेण्याचा वेगवेगळा प्रयत्न करण्याऐवजी हे जाणून- 'ज्याच्या' साहाय्याने घ्यावयाचे त्या 'मनाचेच' यथार्थज्ञान करून घेतले तर सर्व वस्तूंचे ज्ञान एकदम व थोडक्या श्रमात करून घेता येईल. ताबडतोब दुसरा असा विचार येतो की, 'मानवी मनाच्या' यथार्थ स्वरूपाचे सत्यज्ञान करून घेण्याचा अधिक जवळचा रस्ता आहे काय ? आणि मग मानवी मनाच्या यथार्थस्वरूपाचे सत्यज्ञान साक्षात् होण्याचे साधन शोधण्याची धडपड सुरू होते.

### मन समजावून घेण्याची इच्छा

आता या मार्गाच्या शास्त्रीय चर्चेत न शिरताही आपणास एवढे निश्चितपणे समजते की, **माणसाची धडपड जाणिवेच्या कक्षेत येणाऱ्या प्रत्येक शब्द-निर्देशित-वस्तूचे यथार्थ-ज्ञान जाणून घेण्यासाठी चाललेली आहे. अमुक एका वस्तूच्या ज्ञानाने त्याची धडपड थांबते असे आढळून येत नाही.** स्त्री, पुरुष, शरीर-सौष्ठव, सौंदर्य, संयोग, प्रेम या शब्द-निर्देशित वस्तूंच्या यथार्थ ज्ञानाने मानवी मनाची धडपड थांबत नाही. मानवी मनाची धडपड ठराविक शब्द-निर्देशित वस्तूंच्या यथार्थ ज्ञानापुरती मर्यादित राहू शकत नाही. अधिक विचाराअंती असे आढळून येते की या सर्व धडपडीमागे **एकच सूत्र आहे.** ते सूत्र हे की, या असंख्य वस्तूंचे ज्ञान करून देणारे जे 'साधन मन' किंवा बुद्धि- तेच मला संपूर्णपणे समजले तर किती चांगले होईल बरे !

एकदा का 'शब्द-शक्तीचे' हे स्वरूप ध्यानात आले की समजते की **मानवाची धडपड शब्द-शक्तीचे हे सामर्थ्य समजावून घेण्यासाठीच आहे.** ठराविक शब्द-निर्देशित वस्तूंच्या ज्ञानाने त्याचे समाधान कदापी होणार नाही. तसे कुणास वाटत असेल तर तो भ्रम आहे हे निश्चित.

### शब्दशक्तीच्या सामर्थ्याचे यथार्थ स्वरूप समजणे अवश्य

मानवी जीवनाच्या प्रेरणेमागे 'शब्द-शक्तीचे हे अपार सामर्थ्य' कार्यप्रवण आहे हे सत्य आमच्या शब्द-सृष्टीच्या ईश्वरांनी साहित्यिकांनी समजावून घेतले











पाहिजे. काही शब्द वस्तूच्या ' अंशाचीच ' ओळख करून देतात. काही शब्द वस्तूच्या ' विशिष्ट रूपाचीच ' ओळख करून देतात. काही शब्द मात्र संपूर्ण विश्वाचे कोडे उलगडण्याचा मार्ग दाखवितात. आता ज्याला या ज्ञानपिपासेने पछाडले आहे तो माणूस थोडक्याने संतुष्ट होत नाही. तो शब्द–शक्तीचे रहस्य जाणून घेतल्याशिवाय स्वस्थ बसत नाही. कोणत्याही शास्त्राचा पारिभाषिक शब्दकोश उघडला तर त्यात असे अनेक शब्द आढळतात की त्यांचा आपल्या व्यवहारी जीवनाशी सुतराम संबंध नसतो. **शुद्ध ज्ञानपिपासेच्या पोटीच त्या शब्दांचा जन्म झालेला असतो.** मनुष्याला ह्या गोष्टींचा हव्यास का वाटतो ? **याचे उत्तर शब्द–शक्तीच्या सुप्त सामर्थ्यात आहे.**

आपणास शब्द–शक्तीचे संपूर्ण-रहस्य जरी जाणून घ्यावयाचे नसेल, तरी निदान एवढे जाणून घ्या की काही शब्द दूरान्वयाने शब्द-शक्तीचे सामर्थ्य निर्देशित करतात. काही साक्षात् तिच्या स्वरूपाचा निर्देश करतात. तेव्हा मानवी जीवनाच्या कोणत्याही एका भागाच्या ज्ञानाने, मानवी जीवनाचे यथार्थ ज्ञान होईलच असे नाही. कदाचित् प्रथम एकाद्या भागाच्या विकृतीचे ज्ञान होईल. ती विकृती आहे हे कळल्यानंतरच त्या भागाच्या शुद्ध स्वरूपाचे ज्ञान होईल, नाही असे नाही. तरी पण संपूर्ण वस्तूचे ज्ञान होण्यासाठी शब्द–शक्तीच्या सामर्थ्याकडे अनुसंधान न ठेवले तर– मार्ग चुकण्याचीच शक्यता अधिक आहे.

पुनः वस्तूचे यथार्थ ज्ञान झाले पाहिजे, ही जाणीव न ठेवल्यास व्यावहारिक तोटे होतात. जसे, गूळ, साखर या पदार्थांच्या यथार्थ स्वरूपाचे ज्ञान नसल्यास, अतिरिक्त सेवन होऊन आरोग्याला हानी पोचण्याची शक्यता आहे. हाच सिद्धांत सर्व वस्तूंच्या संबंधी मांडता येईल. सर्व वस्तूंचे यथार्थ ज्ञान करून घेण्याची क्षमता मानवी मनात आहे. नव्हे **मानवी जीवनाचे तेच प्रयोजन आहे.** इतकेच नव्हे तर प्रत्येक वस्तूच्या स्वरूपाचे वेगळे वेगळे ज्ञान करून घेता येईल, हा माणसाचा भ्रम आहे. व शब्द-शक्तीच्या सामर्थ्याचा साक्षात्कार करून घेणे हा माणसाचा मूळ स्वभाव आहे. तीच त्याची खरी धडपड आहे. त्याच्याकडेच माणसाची वाटचाल चालू आहे. ' शब्दशक्ती 'च्या सामर्थ्याचे यथार्थ स्वरूप समजावून घेणे या ध्येयाकडे प्रत्येक व्यक्ती क्षणोक्षणी जात आहे. कुणी पुढे जाऊन परत मागे येतात. परंतु अंतिम उद्दिष्ट तेच आहे.

वाद निर्माण होतो तो एवढ्यासाठीच की, काही जणांचा आग्रह असतो की, **या अदृश्य शब्द-शक्तीच्या रहस्याकडे अनुसंधान न ठेवले तर आपणाला भ्रमाच्या भोवऱ्यात सापडावे लागेल. निरोगी जीवन जगता येणार नाही.** अनुसंधान ठेवले तर व्यक्ती व समाज दोहोंचे जीवन योग्य दिशेने जाणार आहे. कारण सामान्यतः ह्या शब्द-शक्तीचे कार्य आपल्या आधीन नाही. आपण तिच्या आधीन आहोत. जसे, गुरुत्वाकर्षणाचा नियम, विद्युत्चे गुणधर्म, ऋतुचक्राचे नियम यांचे ज्ञानामुळे जीवन अधिक सुसंपन्न होते त्यापेक्षा किंबहुना **अधिक हित या शब्द-शक्तीचे रहस्य समजावून घेण्याने होणार आहे.**

## मराठी साहित्यिकांसाठी थोडेसे

वरील विवेचन जर आपणास पटले तर, आपणास मराठी साहित्यिकांनी जीवन, कला, स्त्री, पुरुष, शरीर-सौष्ठव, सौंदर्य, संयोग, प्रेम वगैरे शब्द-निर्देशित वस्तूंसंबंधी जे जे काही लिहिले आहे ते किती तकलुपी आहे याची खात्री पटेल. स्वतःच्या करमणुकीसाठी व दुसऱ्याची करमणूक करण्यासाठी–मनरंजनासाठी कुणी काय करावे हे ज्या त्या व्यक्तीच्या अभिरुचीवर अवलंबून राहील. परंतु रंजन करणाराने यापेक्षा अधिक काही तरी मी करतो आहे, असा भ्रम बाळगू नये. लहान मुलीने लुटुपुटीच्या खेळासाठी केलेली तयारी, तिच्या समग्र खेळातील हालचाली यांचा चित्रपट घेतला, तिचे झालेले मैत्रिणीबरोबरचे संवाद ध्वनि-मुद्रित केले तर त्याने पुष्कळ लोकांचे मनरंजन होणारच नाही, असे कुणी म्हणू शकणार नाही. तसेच मराठी लेखकांच्या कथा-कादंबऱ्यांनी कुणाचे मनरंजन होईल. मात्र व्यापक समाजजीवनाशी त्यांच्या कादंबऱ्यांचा संबंध दूरान्वयानेच जोडता येईल. मुलींच्या खेळाचा व नेफातील आक्रमणाचा जितका संबंध आहे तितका. यापेक्षा अधिक त्यात शोधू पहाणे हा कालाचा व बुद्धीचा अपव्यय आहे.

प्रा. जयंत राइलकर

# 'समाजवादाचा फेरविचार'

जुलै व ऑगस्ट महिन्यांच्या 'नवभारत'च्या अंकांमधील डॉ. पटवर्धन व डॉ. बडवे यांचे 'समाजवादाचे मृगजळ' संबंधाने प्रसिद्ध झालेले लेख महत्त्वाचे आहेत. प्रथम प्रसिद्ध झालेल्या डॉ. पटवर्धन यांच्या लेखाला डॉ. बडवे यांनी उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. डॉ. बडवे यानी पटवर्धनांच्या लेखातील चर्चा उथळ असल्याचे म्हटले आहे. डॉ. पटवर्धनांनी आपल्या छोट्याशा लेखात राज्यशास्त्र, समाजशास्त्र, अर्थशास्त्र वगैरेमधील काही सूत्रे घेऊन त्यांचा वरवरचा विचार केला आहे. ज्याप्रमाणे त्यांच्या विचारांचे स्वरूप ओझरते त्यानुसार त्यांचे निष्कर्षही असमाधानकारक वाटतात. ते मान्य होणे कठीणच आहे. परंतु त्यानी अशाप्रकारे सुरू केलेल्या चर्चेला उत्तर देणे–उत्तर म्हणण्यापेक्षा त्यांच्या विचारांतील एकतर्फीपणा सखोल व सूक्ष्म विचारांची उणीव, व मधून मधून प्रत्ययास येणारी विसंगती स्पष्ट करणे–आवश्यक आहे. डॉ. बडवे यांनी तसा यशस्वी प्रयत्न केला असला तरी तो अपूर्ण वाटतो. त्याच दृष्टीने आणखी थोडा प्रयत्न प्रस्तुत लेखामध्ये केला आहे.

### ध्येयाचा की शास्त्राचा विचार

समाजवादासारख्या महत्वाच्या विषयाला हात घालण्यापूर्वी प्रथम एक विचार संभवतो. येथे आपण समाजवादाच्या ध्येयाचा केवळ विचार करीत आहोत की समाजवादाच्या शास्त्राचे विवेचन आरंभले आहे? प्रथम ही गोष्ट डॉ. पटवर्धनांच्या लेखात स्पष्ट केली गेली नसल्यामुळे त्यांचा काहीसा वैचारिक गोंधळ झाला आहे. ध्येयवाद (ideology) व शास्त्र यामध्ये फरक काय? ध्येयवादाला नीतीचे अधिष्ठान असते. त्यामागे न्याय्य अन्याय्यतेचा विचार असतो. नैतिक दृष्ट्या योग्यायोग्य काय ते ठरवून ध्येय निर्माण केले जाते. नीती म्हणजे तरी काय? नैतिक तत्त्वे सर्व प्रकारच्या समाजव्यवस्थांमध्ये, तसेच सर्व काळी व सर्व स्थळी समान असतात काय? या प्रश्नांची उत्तरे देणे तितकेसे सुलभ नाही. परंतु काही नीतितत्त्वे मानवेतिहासाच्या प्रथमावस्थेपासून थेट आजतागायत आढळून येतात. उदा. चोरी करू नये, स्वच्छ रहावे. खरे, सत्य बोलावे वगैरे. परंतु ही तत्त्वे शास्त्रीय वा बुद्धीच्या निकषांवर घासून पाहण्याचा प्रयत्न केला तर तो फोल ठरतो. चोरी हा अनैतिक व्यवहार मानला तरी एखादा असा ध्येयवादी निघतो की जो सतत श्रीमंत व धनिक लोकांना लुटून मिळवलेली संपत्ती गोरगरीबांना वाटीत असतो. अशा व्यक्तीच्या कृत्याचे समाजात कौतुकच होत असते. त्याला अनैतिक ठरविले जात नाही. तसेच गाईच्या मागे धावणाऱ्या कसायाला दिलेले उत्तर हे असत्य वचन मानले जात नाही. तेव्हा ध्येय व नीती यांचे निश्चित शास्त्र नाही. ती एक रूढी असते. त्या त्या समाजाच्या संमतीवर त्यांचे यशापयश अवलंबून असते. फारतर त्याला धर्म म्हणता येईल. तेव्हा समाजवादाचा केवळ ध्येयवादी दृष्टीकोनातून विचार करावयाचा असेल तर त्याला सहसा कुणाचा विरोध संभवत नाही. ध्येयप्रेरक दृष्टीने समाजवादाचा विचार नवीन नाही. ग्रीक तत्त्वचिंतक प्लेटो पासून आजतागायत अनेकांनी त्याचे प्रतिपादन केले आहे, इतकेच नव्हे तर जगातील सर्वच महत्त्वाच्या धर्मांची प्रत्यक्षाप्रत्यक्ष शिकवण त्याच धर्तीची आहे.

मग प्रश्न उद्भवतो तो हा की मार्क्स व या इतर तत्त्ववेत्त्यांमध्ये फरक तो कोणता? याचे उत्तर स्वतः मार्क्सनेच आपल्या विवेचनाच्या सुरवातीला देऊन ठेवले आहे. आजपर्यंत समाजवादाचे झालेले विवेचन अशास्त्रीय आहे. परंतु जगाच्या इतिहासात आता असा एक महत्त्वाचा टप्पा आला आहे की समाजवाद शास्त्ररूपाने प्रगट होणे आवश्यक आहे. याच हेतूने मार्क्सने आपले सर्व लिखाण केले व त्याला सूत्रबद्ध स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. अशा शास्त्राचा विचार बुद्धिप्रामाण्याच्या कसोटीवर करता येणे शक्य आहे.

इतकेच नव्हे तर त्यात विसंगती जाणवल्यास त्यात सुधारणा करून तेच शास्त्र पुढे नेता येईल. महत्त्वाची गोष्ट ही की आपण विचार करीत आहोत तो या शास्त्रीय समाजवादाचा, कारण ध्येयवाद हा चर्चेचा विषय होऊ शकत नाही.

### मार्क्सचे वैशिष्ट्य– शास्त्रीय दृष्टी

यानंतर आपण मार्क्सने वापरलेल्या तेजस्वी भाषेचा थोडाफार विचार करू. मार्क्सने समाजामध्ये विषमता निर्माण होण्याची कारणमीमांसा स्पष्ट केल्यानंतर ती नष्ट करण्यासाठी उपाययोजना सुचविली आहे. ही उपाययोजना एखाद्या छोट्याशा कामगारसमूहापुरती मर्यादित नव्हती. मार्क्सच्या डोळयापुढे केवळ एकाच देशाचा विचार नव्हता; तर संपूर्ण जगभर साम्यवादाचा उदय होईल हे भविष्य त्याला कथन करावयाचे होते. सर्व मानवतेच्या प्रगतीचा मार्ग त्याला दर्शवावयाचा होता. तेव्हा अर्थातच या उद्दिष्टांना योग्य असा शाब्दिक साज चढविणे आवश्यक होते. स्फूर्ति व चेतना निर्माण करण्यासाठी वक्त्याला भाषेवर जोर द्यावा लागतोच. त्याचाच प्रत्यय मार्क्सच्या विवेचनात येतो. शेकडो वर्षांच्या परंपरागत चालीरीती, बलिष्ठ सत्ताधारी व देशातील जास्तीत जास्त संपत्तीची मालकी असलेले भांडवलदार या एकापेक्षा एक जोरदार शक्तींशी लढा द्यावयाचा. व हा कुणी लढा द्यायचा तर दरिद्री कामगारांनी ! ज्यांचे जवळ लढण्यासारखे दुसरे कोणतेही साधन नाही. जे काही आहे ते केवळ संघटनासामर्थ्य. यासाठी तुम्ही संघटित व्हा ! तुम्हाला जग जिंकावयाचे आहे ! हरण्यासारखे तुमच्या जवळ काहीच नाही. अशा तऱ्हेची ज्वलंत भाषा लिहिणे क्रमप्राप्तच होते. त्याने कामगारांना केलेले आवाहन जितके जोरदार तितकेच त्याचे निष्कर्षही जोरदार. या निष्कर्षांच्याच आधारावर त्याने वर्गहीन समाजरचना, कामगारांचे राज्य, खाजगी संपत्तीचे सामाजीकरण ही उद्दिष्टे मांडली आहेत. परंतु हे सर्व शास्त्रीय विवेचन निश्चित नाही. आवाहन हे विचारांपेक्षा भावनेलाच जवळचे असते. तरीही हे ध्येयवाक्य शास्त्राशी संपूर्ण विसंगत आहे असे मात्र नाही. येथे शास्त्र व ध्येय यांचा संगम साधण्याचा मार्क्सचा प्रयत्न दिसतो. याचे कारण या सर्व ध्येयाप्रत पोहोचण्यास मार्क्सने स्वतःच निर्माण केलेल्या समाजवादाच्या शास्त्राचा प्रामुख्याने आधार घेतला आहे. शास्त्रीय समाजवादाच्या पार्श्वभूमीवरच त्याने भविष्यकालीन अंदाज व्यक्त केले आहेत. आपल्या दृष्टीने महत्त्व त्याच्या भविष्यकालीन अंदाजांना नसून त्याच्या शास्त्रीय समाजवादाच्या विवेचनालाच आहे.

### मानवी स्वभाव व समाजवाद

आता आपण मानवी स्वभावाचा थोडा विचार करू. डॉ. बडवे यांनी समाजवाद मानसशास्त्रदृष्ट्याही फोल ठरतो असे प्रतिपादले आहे. मनुष्य निसर्गतःच समान नसतो. शक्ती, युक्ती, रंग, वर्ण, बुद्धी वगैरे अनेक प्रकारे व्यक्तीव्यक्तींमध्ये फरक संभवतो. कोणत्याही दोन व्यक्ती संपूर्णतः सारख्या असू शकत नाहीत. विषमता हे निसर्गाचेच देणे आहे. तेव्हा ती दूर करणे फोल ठरेल. परंतु समाजनिर्मित विषमता मात्र समाजच दूर करू शकेल यात प्रत्यवाय नाही. हा डॉ. बडवेंचा दृष्टीकोन तर्क सुसंगत आहे. परंतु तरीही प्रश्न असा उरतो की काही प्रकारची विषमता केवळ निसर्गनिर्मित असते म्हणून ती योग्य मानावी काय ? निसर्गाच्या सर्वच प्रवृत्ती इष्ट थोड्याच असतात ? ज्याप्रमाणे निसर्गाच्या कृपेने अन्नधान्य, खनिजे, पाणी, प्रकाश वगैरेंचा पुरवठा होतो त्याचप्रमाणे अतिवृष्टी, पूर, वादळ, वणवा, हिंस्रश्वापदे, रोगराई वगैरे या आपत्ती नैसर्गिक नव्हेत काय ? परंतु अशा तऱ्हेची संकटे केवळ नैसर्गिक म्हणून मानव सहन करीत नाही. आजमितीचा मानवेतिहास हा अशा तऱ्हेचा नैसर्गिक रौद्ररूपाविरुद्धचा सतत लढाच आहे. यासच आपण मानवी संस्कृतीचे व प्रगतीचे सार समजतो. आणि शास्त्रे म्हणजे तरी काय तर निसर्गाचेच सूक्ष्म अवलोकन व अभ्यास. जेव्हा जेव्हा निसर्ग मानवाला उपयुक्त ठरतो तेथे तेथे ती उपयुक्तता वाढविणे व जेथे अनुपयुक्तता आढळेल तेथे ती नाहीशी करणे हेच आपण मानवाचे ध्येय, प्रगतीचे द्योतक व कर्तृत्वाचे सार मानीत नाही काय ? तेव्हा व्यक्ती व्यक्तींमध्ये जरी निसर्गनिर्मित भिन्नता असली तरी ती दूर करण्यासाठी मानवाने झटले पाहिजे. तसे प्रयत्न अनेक धर्मांनी, तत्त्ववेत्त्यांनी, समाजसुधारकांनी वरचेवर केले आहेत. परंतु त्यासाठी कुणीही खास शास्त्र निर्माण केले नाही. मार्क्सने ती जबाबदारी शिरावर घेऊन समाजवादाचे शास्त्र निर्माण केले.

अर्थात् त्याचा प्रयत्न यशस्वी कितीसा झाला अथवा त्याचे विवेचन संपूर्णपणे शास्त्रीय आहे काय हा चर्चेचा भाग होऊ शकेल. परंतु एकदा समाजवादाला शास्त्रीय बैठकीवर बसविले की त्याला विशेषच महत्त्व प्राप्त होते. त्याचा थोर विद्वानांकडून अभ्यास होऊ लागतो. त्याला चिरकालीन परिपक्व स्वरूप प्राप्त करून देण्याची शक्यता निर्माण होते. तेव्हां विषमता दूर करण्याचे या पूर्वीचे प्रयत्न ध्येयवादी स्वरूपाचे व धर्माच्या आच्छादनाखाली दडलेले असे होते. आता त्यांना शास्त्रीय स्वरूप प्राप्त झाले आहे.

यानंतर मानवी वर्तणुकीचा थोडाफार विचार करणे आवश्यक आहे. अनेक तत्त्ववेत्यांनी आजवर मानवी वर्तणुकीबाबत विविध मते मांडली आहेत. परंतु बहुधा असे होते की, प्रत्येक विचारवंत मानवी स्वभावातील विशिष्ट गुणावगुणांवर आपल्या गरजेप्रमाणे व सोई-प्रमाणे भर देत असतो. एखाद्या स्वभाववैशिष्ट्याचा आधार घेऊन आपली तात्त्विक कसरत सुरू करतो. कुणी म्हणतात मानव एकलकोंडा आहे, कुणी म्हणतात तो समाजप्रिय आहे, कुणी म्हणतात तो सहनशील, परोपकारी व स्वार्थत्यागी आहे तर या उलट काहींच्या मते तो अत्यंत लोभी व स्वार्थी आहे. काहीच्या मते निसर्गतःच मानव समान आहे तर काहींचे म्हणणे निसर्गतः मानवामानवामध्ये पराकोटीची विषमता आहे. गेल्या एकदोन शतकांचाच आपण विचार करू लागलो तरी हॉब्स, लॉक व रूसो या तिघां-नीही मानवस्वभाव कसा भिन्न कल्पिला आहे हे सहज स्पष्ट होईल. या तिघाही लेखकांचे उद्दिष्ट तसे पाहाता समानच होते. 'राज्य' संस्था (State) ही 'सामाजिक करारा' मधून (Social Contract) प्रस्थापित झाली आहे हे सिद्ध करण्याचा तिघांचाही हेतु होता. परंतु हॉब्स म्हणतो निसर्गतः मानव स्वार्थी, लोभी, कृपण व दंगेखोर असतो. तर लॉक म्हणतो मानव निसर्गतः शांतता प्रिय असतो. तर फ्रेंच तत्त्ववेत्ता रूसो म्हणतो स्वभावतःच मानव परोपकारी व स्वार्थत्यागी असला तरी याच प्रवृत्तीच्या जोपासनेसाठी व वाढीसाठी राज्यसंस्थेची निर्मिती झाली आहे. यानंतर गेल्या शतकामध्ये इंग्लंडमध्ये 'उपयुक्तता – वादाचा' (utilitarianism) प्रसार सुरू झाला. या तत्त्व-ज्ञानाचा जनक जो बेंथॅम याने तर प्रत्येक व्यक्ती सर्वच क्रियामध्ये सतत व्यावहारिकता पाहात असते असे बजावले आहे. सर्वच गोष्टींचा फायद्या-तोट्याच्या समीकरणामधून विचार करणे हाच मानवी स्वभाव असे त्याचे म्हणणे. तेव्हा विविध तत्त्ववेत्यामध्ये मानवी स्वभाव व वर्तणूक ह्या संबंधाने एकमत होऊ शकत नाही हे उघड आहे. याचे कारण काय असावे ?

वस्तुतः मन हे अत्यंत चंचल असते. त्यानुसार मानवी स्वभाव व मानवी वर्तणूक ह्या काही एकाच साच्यांतील अडाखेबंद गोष्टी होऊ शकत नाहीत. त्यामध्येही चांचल्य असणे स्वाभाविक आहे. भिन्न भिन्न परिस्थितीत मानवी स्वभावांचे अनेक पैलू उमटत असतात. स्वभावाचे कोणतेही एकमेव अंग जमेस धरून चालणार नाही. मनुष्य जसा लोभी तसाच प्रसंगानुरूप परोपकारी होतो. जसा तो स्वार्थी तसाच स्वार्थत्यागी व जसा एकलकोंडा तसाच तो समाजप्रियही आहे. मानवी स्वभावाचे जसे काही गुणकारी पैलू आहेत. तसेच काही अवगुणकारी पैलूही आहेत. त्या त्या तत्त्ववेत्यांनी आपल्या आवश्यकतेनुसार विशिष्ट गोष्टींवर भर दिला आहे इतकेच. सर्व-साधारणतः कुणाही तत्त्वज्ञाचा हेतू गुणांची जोपासना व अवगुणांची अवहेलना करणे असा असतो. अशाच तऱ्हेचा प्रयत्न समाजवादी लेखकांचा आहे. त्यांचे उद्दिष्ट आर्थिक, राजकीय, सामाजिक व तत्सम क्षेत्रात समानता निर्माण करणे असे असल्यामुळे 'मानव निसर्गतःच समान आहे' ( All men are born equal ) या ध्येयवाक्याचा ( Slogun ) ते आधार घेतात. ध्येय वाक्यांचा अर्थ लक्षात घेणे फारसे कठीण नसते. जेव्हा सर्व मानव समान आहेत असे म्हटले जाते तेव्हा तसे म्हणणाऱ्याच्या मनात ते तसे असावेत अशी प्रबळ इच्छा असते. परंतु त्याचबरोबर प्राप्त परिस्थितीत ते तसे नाहीत याची प्रखर जाणीवही असते. परंतु तरीही या अर्धसत्याचा तो आधार घेत असतो. तेव्हा मनुष्यस्वभाव संमिश्र असला तरी तो घडविण्याची जबाबदारी समाजसुधारकांची असते. तसाच एक प्रयत्न समाजवादी विचारवंतांचा आहे. फरक इतकाच की समाजवाद हे मानवी इतिहासातील अखेरचे स्थित्यंतर असल्याची ग्वाही समाजवादी लेखक देत असतात. त्याचा थोडा विचार होणे आवश्यक आहे.












## समाजवादाच्या उदयाची पार्श्वभूमी

जगाच्या इतिहासाकडे सहज दृष्टिक्षेप टाकला असता असे आढळून येईल की बहुतेक सर्व देशांमध्ये सुमारे १७व्या–१८व्या शतकापर्यंत राजेशाही व साम्राज्यशाही यांचे सर्वत्र वर्चस्व होते. बहुधा वरचेवर अनेक देशांमध्ये अनियंत्रित व अमर्यादित जुलमी शासनाखाली सामान्य जनता दडपली जात होती. राज्यव्यवस्थेमध्ये सर्वसाधारण व्यक्तीस काहीच स्थान नव्हते. फारतर जमीनदार, इतर धनिक वर्ग व धर्मगुरू यास कमी अधिक महत्त्व दिले जाई. अशा अनिर्बंध राजसत्तेचे समर्थन करणारे सिद्धांतही तयार केले गेले होते. राजा हा ईश्वराचा अंश. राजसत्ता ही ईश्वरदत्त देणगी असते. राजाची इच्छा ही ईश्वराचीच इच्छा. तेव्हा लोकानी राजाचे हुकूम मानावे व त्याची आज्ञा पालन करावी हेच त्यांचे धार्मिक कर्तव्य होय. धार्मिक अंधश्रद्धेमुळे व बौद्धिक ऱ्हासाच्या पायी ही स्थिती शतकानुशतके अबाधित राहिली. परंतु १८ वे शतक हे मानवी इतिहासातील बौद्धिक विकासाचे शतक मानले जाते. या शतकात राजसत्ते-विरुद्ध सामान्य जनतेस उद्युक्त करणारे लिखाण निर्माण झाले. राजसत्ता ही ईश्वरदत्त नसून राज्य-संस्था सामाजिक करारामधून निर्माण होते या तत्त्वाचा याच सुमारास उदय झाला. हॉब्स व लॉक या इंग्लिश विचारवंतानी या दृष्टीने पहिले पाऊल टाकले. रूसो या फ्रेंच लेखकाने हाच विचार पुढे नेला. रूसोचे लेखन क्रांतिकारक मानले जाते. फ्रेंच राज्यक्रांतीला प्रत्यक्षाप्रत्यक्ष प्रेरणा रूसोच्या विचारांमधून मिळाली. त्याचे ' जनरल वील ' ( General Will ) हे तत्त्व तर राज्याच्या सार्वभौम तत्त्वाला उघड उघड आव्हानकारक होते. सार्वभौमसत्ता ही राजा नामक एका व्यक्तीच्या ( अथवा व्यक्तिसमुदायाच्या ) हाती असते ही कल्पनाच त्याचे दृष्टीने चुकीची आहे. सार्वभौम सत्ता सर्व जनतेमध्ये समाविष्ट असते. सर्व नागरिक हेच खरे सार्वभौम. त्यांनी मनात आणले तर केव्हाच राजसत्ता उलथली जाईल. तेव्हा त्यांची मर्जी हीच महत्त्वाची. तेव्हा नागरिकांना योग्य वाटेल अशाच व्यक्तींची शासनकर्ते म्हणून नियुक्ति करण्याचा अधिकार त्यांना पोहोचतो. या मधूनच अर्वाचीन लोकशाहीचा उगम झाला. सर्व नागरिकांनी निवडलेले राज्यकर्ते व त्यांच्या मर्जीनुसार जोपर्यंत राज्यकारभार केला जाईल तीच त्यांची मुदत हाच आधुनिक लोकशाहीचा संदेश. एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीसच पाश्चि-मात्य देशात या तत्त्वाचा झपाट्याने प्रसार झाला. व्यक्तिस्वातंत्र्याचा झेंडा फडकला व लोकशाहीचा दीप उजळला.

## व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेचा विस्तार

मूलतः व्यक्तिस्वातंत्र्याची ही कल्पना राजकीयक्षेत्रा-पुरती मर्यादित होती. परंतु एकदा व्यक्तिस्वातंत्र्याचा आस्वाद घेतल्यावर तिला मर्यादा का सहाव्यात ? आणि असल्याच तर त्या झुगारून का न द्यावा ? अर्थातच हे राजकीय स्वरूपाचे व्यक्तिस्वातंत्र्य अर्थ-क्षेत्रातही शिरू लागले. ॲडॅम स्मिथ, रिकार्डो, मिल या इंग्लिश व से या फ्रेंच अर्थशास्त्रज्ञांनी आत्यंतिक व्यक्तिवादी भूमिका घेतली. प्रत्येक व्यक्तीस आर्थिक क्षेत्रात स्वेच्छेने वागू दिल्यास ( Laissez faire Theory ) ती स्वतःचा अतोनात आर्थिक विकास करू शकेल. व्यक्तिच्या प्रगतीमध्ये कोणतीही राजकीय, धार्मिक व सामाजिक बंधने नसावीत. असल्यास ती झुगारून देऊन आर्थिक प्रगतीसाठी व्यक्तीस्वातंत्र्याची जोपासना करावी. त्यायोगेच नैस-र्गिक स्पर्धेच्या नियमानुसार प्रत्येक व्यक्ति समृद्ध होईल. आणि समाज हा अखेर व्यक्तींचा बनला अस-ल्यामुळे प्रत्येक व्यक्तीची प्रगति हीच पर्यायाने समा-जाची प्रगती. पाश्चिमात्य देशात गेल्या शतकात या तत्त्वाचा प्रसारही झपाट्याने झाला. अधिकाधिक समाधान व अधिकाधिक नफा ही ध्येये उराशी बाळगून भांडवलदार औद्योगिक विकासाच्या मागे झुंपले याच सुमारास फोफावत गेलेली यांत्रिक व औद्योगिक क्रांति त्यांच्या मदतीस धावून आली. औद्योगिक भर-भराट व संपत्तीचे मुबलक उत्पादन निर्माण होऊ लागले. परंतु याचा अंतिम परिणाम तत्त्ववेत्त्यांच्या मूळ विधानाशी सुसंगत राहिला नाही. देशातील संपत्ती व उद्योग यांच्या वाढीला ऊत आला खरा; परंतु अर्थशास्त्रामध्ये उत्पादन हा केवळ एक टप्पा असून त्याच्या मागोमाग धावणारा महत्त्वाचा भाग म्हणजे त्या उत्पादनाचे वाटप. त्याकडे मात्र दुर्लक्ष होऊ लागेल. येथेही व्यक्तिस्वातंत्र्य व नैसर्गिक स्पर्धा यांच्या आधारे ' न्याय्य ' वाटपाचे सिद्धान्त तयार केले गेले. परंतु

प्रत्यक्ष परिस्थितीत मजुरांना अनेक हालअपेष्टांना तोंड द्यावे लागेल. अत्यंत लाजिरवाणे वेतन, प्रदीर्घ कामाचे तास, कारखान्यातील असुरक्षित व गलिच्छ वातावरण या सर्वांमधून भांडवलदार वर्ग गब्बर होत जाऊन कामगार वर्ग सतत भरडला जाऊ लागला. सर्व पाश्चिमात्य देशामध्ये हाहाःकार उडाला. कामगार संघटनांचे प्रयत्न सुरू झाले. समाज सुधारकांनी टीकेचा भडिमार उठविला. गरीबी व दारिद्र्याविरुद्ध बंड उभारले गेले. इंग्लंडच्या कायदेमंडळाने काही कायदेही केले; परंतु हे सर्व पुरेसे नव्हते. याचे कारण ज्यांचे हाती आर्थिक संचय होता अशा उद्योगपतींचेच राजसत्तेवर वर्चस्व होते. तसेच प्रचलित परिस्थितीस अर्थशास्त्रज्ञांनी शास्त्रीय तत्त्वांचा भक्कम आधार दिला होता. तेव्हा यामधून जर कोणता मार्ग संभवत असेल तर तो एकच. ज्याप्रमाणे व्यक्तिवाद शास्त्राचा आधार घेऊन पुढे सरसावला त्यास आव्हान देण्यासाठी समाजवादही शास्त्रीय पातळीवर आणून ठेवणे. आधुनिक युगाचा धर्म यांत्रिक-औद्योगिक प्रगती व व्यक्तिस्वातंत्र्य असेल तर भविष्यकाळाचा धर्म समाजवाद असणे अटळ आहे. हे कोणी नाकारू शकणार नाही. केवळ शास्त्रच असे दर्शविते की मानवेतिहासातील पुढचा व शेवटचा टप्पा म्हणजे समाजवाद. अशा तऱ्हेचा दृष्टीकोन मार्क्सवादातून निर्माण होणे ऐतिहासिक दृष्टया क्रमप्राप्तच ठरते.

## व्यक्तिवाद की समाजवाद ?

आता प्रश्न असा उरतो की, व्यक्तिवाद श्रेष्ठ की समाजवाद श्रेष्ठ ? हे दोन वाद परस्परांचे शत्रू आहेत हे तर उघडच आहे. परंतु त्यांची पार्श्वभूमी पाहू जाता त्यांचे मूळ हेतू समानच आहेत. व्यक्तिवाद्यांच्या दृष्टीने प्रत्येक व्यक्ति निसर्गतः स्वतंत्र व भिन्न असते. प्रत्येकजण वैयक्तिक हित व प्रगतीच्या मागे लागलेला असतो. व्यक्तीचे हित हेच समाजाचे हित. व्यक्तिव्यक्तींच्या विकासामधूनच समाजाचा विकास होत असतो. या विवेचनामध्ये नेहमीचाच एक दोष प्रामुख्याने जाणवतो. तो म्हणजे एकतर्फीपणाचा. प्रत्येक व्यक्ती केवळ वैयक्तिक हिताच्या मागे असते व तिला पुरेसे स्वातंत्र्य दिल्यास ती प्रगतीच्या शिखरावर पोहोचू शकेल हे फक्त अर्धसत्य आहे. अशा विचारसरणीमधून वैयक्तिक स्वार्थ, लोभ, संधिसाधूपणा व पर्यायाने हे साध्य करण्यासाठी लाच, चोरी, लुबाडूवृत्ति या तऱ्हेचे वाममार्ग यांना चालना मिळते. तसेच वैयक्तिक प्रगती जरी थोर असली तरी त्यासाठी संपूर्ण व्यक्तिस्वातंत्र्य द्यावे, त्यामध्ये सामाजिक व आर्थिक बंधने नसावीत हे केवळ मर्यादित अर्थाने खरे आहे. खऱ्याखुऱ्या वैयक्तिक प्रगतीसाठी संपत्तीची जरी गरज असली तरी संपत्ति हे जीवनध्येय मानणे हे काही विकासाचे लक्षण नव्हे ही विकृतीच मानावी लागेल.

समाजवादाचा दृष्टिकोन बरोबर याउलट आहे. त्यानुसार व्यक्ती ही समाजापेक्षा मोठी असूच शकत नाही. समाजाचे हित हेच सर्वश्रेष्ठ. समाजाच्या प्रगतीवरच व्यक्तीची प्रगती अवलंबून असेत. व्यक्ती ही इतकी परावलंबी व समाजाशी निगडित असते की तिचे समाजापासून स्वतंत्र असे स्वरूप कल्पिताच येत नाही. समाज टिकला तरच व्यक्ती टिकेल. आणि समाज समाज म्हणजे तरी काय ? हेतुपुरःसर एकत्र आलेल्या काही व्यक्तींचा समुदाय म्हणजे समाज. अशा समाजामध्ये कुटुंबासारख्या छोट्या व प्राथमिक संस्थेपासून ते थेट 'राज्य' अथवा 'संयुक्त राष्ट्र' यासारख्या व्यापक व बलाढ्य अशा सर्वच संस्थांचा अंतर्भाव होतो. बालसंगोपन व शिशुसंवर्धनासारखे मूलभूत कार्य कुटुंबसंस्थेने पार पाडले नाही तर कुणातरी व्यक्तीचा निभाव लागेल काय ? जी गोष्ट बालपणासंबंधी तीच उर्वरित जीवनासंबंधाने. तेव्हा समाजाची गरज ही आपल्याला, पावलो पावली भासत असते. आपली शक्ती, युक्ती, बुद्धी, आचार, विचार, कला, चातुर्य सर्व काही आपण समाजामधून अथवा समाजाच्या मदतीने वेचित असतो. अतएव व्यक्तीचा शैक्षणिक, बौद्धिक, सामाजिक, आर्थिक सर्व प्रकारचा विकास समाजावर अवलंबून असतो. समाजापुढे व्यक्ती कनिष्ठ मानावी.

या दोनही विचारसरणीमध्ये एकतर्फी दृष्टिकोन आहे. यामुळेच असे म्हणणे प्राप्त होते की, प्रत्येक तत्त्ववेत्ता आपल्या सोईप्रमाणे मानवी स्वभाव गृहीत धरतो, येथे त्यातल्या त्यात लक्ष वेधणारी एक गोष्ट अशी की ऐतिहासिक सत्यशोधनाचाच प्रयत्न करावयाचा झाल्यास समाजवाद हा व्यक्तिवादाच्या नंतर निर्माण झाला आहे. इतकेच नव्हे तर व्यक्तिवादाच्या

अत्यंत हिडिस स्वरूपाचा प्रत्यय आल्यामुळेच किंबहुना समाजवादाच्या शास्त्राची निर्मिती झाली. आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे अत्यंत पराकोटीचे परस्परावलंबित्व हे आधुनिक युगाचे वरदान आहे. एक व्यक्ति, दुसऱ्या व्यक्तीवर, एक संस्था दुसरीवर, एक विभाग दुसऱ्या विभागावर इतकेच नव्हे तर एक राज्य दुसऱ्या राज्यावर इतके काही अवलंबून असते की केवळ व्यक्तिवादाचा पुरस्कार आज संकुचित भासेल इतकेच नव्हे तर प्राप्त परिस्थितीत तो अशक्य ठरेल. आपण वरच्येवर जे ऐकतो की समाजवाद हे चालू युगाचे सत्य आहे ते केवळ याच अर्थाने. काळाचा ओघ ओळखला पाहिजे व समाजवादाकडे झुकले पाहिजे. तेव्हा सामाजिक परस्परावलंबित्वाच्या दृष्टीने समाजवाद अत्यंत महत्त्वाचा व आवश्यक ठरतो. परंतु मानवी प्रगती हेच समाजवादाचे अंतिम ध्येय असेल तर व्यक्तिस्वातंत्र्याची जपणूक महत्त्वाची ठरते. व्यक्तीच्या विकासासाठी योग्य ती परिस्थिती निर्माण करणे म्हणजेच प्रत्येकास विकासासाठी मुबलक संधी व वाव निर्माण करून देणे हेच समाजाचे कर्तव्य ठरते. व्यक्तीच्या स्वातंत्र्याची हमी जशी समाजाने घेतली पाहिजे त्याच प्रमाणे मिळालेल्या संधीचा जास्तीत जास्त फायदा घेऊन स्वतःची प्रगती साधणे व तिचा समाजासाठी वापर करणे हे व्यक्तीचे कर्तव्य ठरते. आत्यंतिक व्यक्तीवाद जसा अनिष्ट तसाच आत्यंतिक समाजवादही. परंतु याचा अर्थ समाजवादाकडून मागे वळणे असा होत नाही. समाजवादाचे शास्त्र जाचक भासत असल्यास त्यात अनुरूप बदल घडवून आणले पाहिजेत. समाजवादावरील चर्चा या पार्श्वभूमीवर करणे योग्य ठरेल.

शेवट एकाच गोष्टीचा विचार करून हा लेख संपवू या. श्री. पटवर्धन यांनी कल्याणकारी अर्थव्यवस्थेचा उल्लेख केला आहे. परंतु हा काही समाजवादाला पर्याय होऊ शकत नाही. एक तर कल्याणकारी अर्थव्यवस्थेचा निश्चित सिद्धान्त नाही. त्याचा पुरेसा विचार झालेला नाही. अशा प्रकारच्या गुळमुळीत वाक्प्रचारांमधून संपूर्ण समाजव्यवस्था बदलण्याचा प्रयत्न करू या, असे म्हणणे हास्यापद ठरेल. पाश्चिमात्य देशामध्ये हा शब्दप्रयोग वरच्येवर केला जातो. अर्थात त्यामागे विविध हेतु दडलेले असतात. एका बाजूला समाजवादाला विरोध व दुसऱ्या बाजूला व्यक्तिवादाचे सनातनी स्वरूप जतन करण्याचा प्रयत्न अशा स्थितीत समाजवादाचे संकट पुढे ढकलण्यासाठी व शक्य झाल्यास टाळण्यासाठी अशा शब्दप्रयोगांचा उपयोग केला जातो. काही वेळा समाजवादाचे धोरण उघड उघड पुरस्कारणे शक्य नसल्यामुळे अथवा तसे धाडस नसल्यामुळे या भाषेचा बुरखा पांघरला जातो. परंतु निष्कर्षच काढावयाचा झाल्यास असे म्हणावे लागेल, की कल्याणकारी अर्थव्यवस्था हा समाजवादाला पर्याय नसून त्याच दृष्टीने वाटचाल आहे.

तात्पर्य, समाजवादाकडे पाठ फिरवावी हे म्हणणे आज रास्त ठरणार नाही. त्यामध्ये दोष आहेत. ठीक आहे. दोष नाहीत कोठे ? आजपर्यंत एक तरी गोष्ट कधी अंतिम सत्य अथवा अंतिम तत्त्व म्हणून मान्य झाली आहे काय ? आणि मान्य झाली असलीच तरी ती तशी चिरकाल टिकली आहे काय ? कोणत्याही विचारांमधील गुणांची जपणूक करून दोष झुगारून द्यावे हीच मानवी परंपरा आहे. हाच मानव धर्म व मानवेतिहास !










॥ श्री ॥

# दि बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट लिमिटेड, पुणें २.



आतां कोदंड घेऊनि हातीं । आरूढ पां इये रथीं ।
देईं आलिंगन वीरवृत्ती । समाधानें ॥ — श्रीज्ञानेश्वरी.

पाकिस्तानने भारतावर आक्रमण केल्यामुळें, आपल्या मातृभूमीच्या रक्षणासाठीं आपल्या शूर जवानांनीं प्राण पणाला लावून रणांगणावर मर्दुमकी गाजवून शत्रूला धूळ चारली, याबद्दल भारतीय जनता जवानांशीं सदैव कृतज्ञ राहील. या कसोटीच्या वेळीं सर्व भारतीयांनीं एक होऊन आपली सारी शक्ति जवानांच्या पाठीशी उभी करून त्यांना साथ दिली व राष्ट्राच्या अभेद्य एकजुटीचा प्रत्यय आणून दिला. यापुढें युद्ध-साहित्यापासून तो थेट अन्नधान्यापर्यंत सर्वस्वी स्वावलंबी होणें हे उद्दिष्ट साधण्यासाठीं आपण अविश्रांत झटलें पाहिजे. आपण सारे राष्ट्राकारितां आहोत. या भावनेने आपल्या वांट्याला आलेली कर्तव्यें चोखपणें बजावून आपलें उद्दिष्ट साधण्यास सहाय्य करूं या. सिंडिकेटही आपल्या कारखान्यांतून साखरेचें व स्पिरीटचे जास्तीत जास्त उत्पादन वाढवून देश बलवान व स्वावलंबी करण्यांतील आपला वांटा उचलीत आहे.

आपल्या शूर जवानांनीं सीमोल्लंघन केलेंच आहे. दिवाळी व नूतन वर्षानिमित्त जवानांना व जनतेला शुभेच्छा.

**गो. श्री. वाळिंबे**
बी. कॉम्.
ऑफिशिएटिंग मॅनेजर

**शं. ल. लिमये**
बी. एससी., एलएल्. बी., वकील
अध्यक्ष








श्री. सु. बा. कुलकर्णी

# कातकऱ्यांचे उखाणे

## कातकऱ्यांचे जीवन

कातकरी ही महाराष्ट्रातील एक प्राचीन वन्य जमात आहे. यांची वसती प्रामुख्याने जव्हारपासून चिपळूण-पर्यंतच्या कोकणपट्टीत केंद्रित झालेली असून ती एक लक्ष चाळीस हजार एवढी आहे. जंगलातील जळाऊ लाकडे व कंदमुळे खेडोपाडी आणून विकणे हा यांचा पुरातन व प्रमुख व्यवसाय असून; अनुषंगाने, वन्य पशूंची शिकार करणे, नदीनाल्यांतून मासे मारणे, कोळशाच्या भट्ट्या लावणे व थोडीशी वरकस शेती करणे हेही व्यवसाय चालतात. यांची वसाहत (कातवाडी) गावाबाहेरील डोंगरकपारीत किंवा नदीकिनारी असते. हे लोक अत्यंत मागासलेले असून बहुशः अर्धपोटी जीवन कंठीत असतात. नाचणी, वरी, हरीक, कंदमुळे व वन्य पशूंचे मास हे यांचे अन्न असून, यांच्या पोटजातीपैकी ' ढोर कातकरी ' याना तर गाय, म्हैस, उंदीर, खारी व कुत्री देखील अभक्ष्य नसतात. यांच्या झोपड्या गवत अगर पेंढ्याने शाकारलेल्या असून त्यात तीनचार गाडगी, एकदोन पातेली, थाळया, केरसुणी, जाते, दगडाचे उखळ (व्हाईन्), मुसळ (मुंड्), कोयती, कुऱ्हाड, धनुष्य (धुनु), बाण (चिंबुती), मासे धरण्याचा पाग व वेताच्या टोपल्या (टोके) याव्यतिरिक्त फारसे सामानसुमान नसते.

' पिणे ', गाणे व नाचणे या तीन गोष्टी म्हणजे कातकऱ्यांचे जीवनसर्वस्व. एकादा गलास झोकून हे नाचू लागले म्हणजे भिंगरीसारखे नाचतात, वेड्या पाखरासारखे गातात; मिळाल्यास ढोल, नाहीतर घास-लेटच्या डब्याच्या ठेक्यावर अखंड रात्र तीसचाळीस देह डुलत असतात. अशावेळी त्याना उद्याची चिंता नसते, दारिद्याची खंत नसते, श्रमाची पर्वा नसते, देहाची शुद्ध नसते.

कातकरी जसे नृत्यवेडे आहेत, तसेच गानवेडेही आहेत. त्यांची गीते त्यांच्यासारखीच साधीभोळी, त्यांच्यासारखीच खडबडीत. वृत्तमात्रादी बंधनांशी त्यांची सोयरीक जुळत नाही. नाचाच्या ठेक्याशी ओढूनताणून शब्द जुळले म्हणजे जमले! कातकऱ्यांच्या लोकसाहित्यात लोककथांचे दालन विशेष समृद्ध आहे. यांची भाषा भिल्लीवर्गीय भाषांपैकी एक असून, यांच्या लोककथातील कथाबीजांचे व कल्पनाबंधांचे भिल्ल, वारली व कोकणे यांच्या लोकसाहित्यातील कथा-बीजे व कल्पनाबंध यांच्याशी अतीव साम्य आढळून येते. उखाणे हे कातकरी लोकसाहित्याचे एक वैशिष्ट्य-पूर्ण अंग आहे. प्रस्तुत लेखात याच अंगाचा परिचय करून दिलेला आढळेल. त्यातील कल्पनावैभव, रचनेचे बंध व वाङ्मयीन गुणदोष कातकऱ्यांच्या जीवनाच्या पार्श्वभूमीवर पारखून घ्यावे. फूटपट्टया वेगळया असाव्या.

## उखाण्यांचा इतिहास

उखाणे हे लोकसाहित्याचे प्रमुख दालन आहे. यांची परंपरा फार प्राचीन असून जगातील सर्व प्रगत–अप्रगत समाजातून यांचे अस्तित्व विविध स्वरूपात आढळून येते. ऋग्वेदातील एकचाकी रथ–कल्पनेवर आधारलेले ब्रह्मोद्य[१] किंवा स्फिंक्सने ईडिपसला घातलेले कोडे[२] ही उखाण्यांची प्राचीन उदाहरणे सांगता येतील. मराठीत आहाणा, हुमान, उमान, उमाण, कोडे, कोहाडा, कुलंगडे व संस्कृतमध्ये ब्रह्मोद्य, कूट, प्रवल्हिका

---

१. सप्तयुञ्जन्ति रथमेकचक्रमेको अश्वो वहति सप्तनामा ।
त्रिनाभि चक्रमजरमनर्वं यत्रेमा विश्वा भुवनाधि तस्थुः ॥ – ऋग्वेद १·१६४·२

२. ' What animal is that which goes on four feet in the morning, on two at midday, and on three in the evening ? ' ( Man )
— Encyclopedia Americana



अनुक्रमणिका








प्रहेलिका असे या शब्दाचे पर्याय आढळतात. हा शब्द संस्कृत 'आख्यान–आख्यानक' (प्रा. आहणा) या शब्दापासून व्युत्पादिला जातो. कातकरी मात्र उखाण्याचा 'परिश्न सोद्ना' (प्रश्न विचारणे) असाच उल्लेख करतात. 'आह्ना मार्ना' याचा अर्थ त्यांच्या भाषेत 'निंदायुक्त टोमणा मारणे' असा होतो.

उखाण्याची सांस्कृतिक पार्श्वभूमी कोणतीही असली तरी त्याची प्रेरणा ही सर्वसाधारणतः ज्ञान व मनोरंजनाचीच असते. स्थलांतर, संस्कृतिसंकर, परसंस्कृति–परिचय व जीवन पद्धतीतील बदल हे उखाण्याचे विषय बदलण्यास कारणीभूत होतात. अशा नवागत विषयांची गुंफण जुन्याच पारंपरिक कल्पनाबंधातून केली जाते. अभिजात साहित्यात आढळून येणाऱ्या कूट, समस्या इत्यादी वाङ्मय प्रकारांच्या प्रेरणा या वैयक्तिक असून, त्यातील कल्पनावैभव हे प्रौढ व व्युत्पन्नांनाच पेलण्यासारखे असते. लौकिक उखाण्यांचे क्षेत्र मात्र स्त्रिया, बालक व सामान्य जनांपर्यंत मर्यादित असते.

### कातकऱ्यांच्या उखाण्याची वैशिष्ट्ये

नाचाच्या प्रसंगी किंवा एरवी पाचपंचवीस कातकरी स्त्रीपुरुष एकत्र जमल्यावर आपले श्रेष्ठत्व व बहुश्रुतपणा सिद्ध करण्यासाठी एकमेकांना प्रश्न विचारतात. या प्रश्नांचे स्वरूप विविध प्रकारचे असते. नाचाच्या प्रसंगी विचारले जाणारे गीतमय कूटप्रश्न हे अध्यात्मिक स्वरूपाचे, प्राचीन व पारंपरिक असतात. बळिप्रतिपदेच्या दिवशी वेगवेगळ्या कातवाड्यांवरील नर्तकांचे ताफे एकत्र जमतात व नाचताना अशा प्रकारचे प्रश्न एकमेकास विचारतात, सर्वच प्रश्नांची उत्तरे प्रश्न विचारणारास माहिती असतातच असे नाही. कातकऱ्यांची माहिती देताना आपल्या 'बदलापूर' या ग्रंथात चापेकरांनी अशा प्रश्नांचे अनेक मासले दिले आहेत.[३] कलगी–तुऱ्याच्या भांडणाची काही गीते कातकऱ्यांच्या नाचाच्या वेळी गायली जातात, त्यांचेही स्वरूप अध्यात्मिकच असते. अशा एका गीताचा मासला पुढे दिला आहे. 'गोळिङ्कार् का र देव् पान्यावरी उबडा त्याने आङ्गातुन् झाला कमळ् फूल् तो फूल् लाव्ना कोनाचे वव्शयाला तसला घूमला देव् गेला केदय फूलाला केदयाचा फूल् नाय् फुल नाय् त्याला भेटला फूल् नाय् त्याला भेटला फूल् गेला पताळ घराला व त्याने देवानी जाऊन् धरला गो याला मङ्ग गो याचा तोण्ड व्हता कोण बाजूला तोण्ड कोण बाजूला पुसत कोळगीला'

[गोळिङ्कार्–गोलाकार. उबडा–वर आला. वव्शाला – वंशाला, वाऱ्याला. घूमला – वारे संचारले. केदय फूल – उंबराचे फूल. कोळगी – कलगी.]

गोलाकार देव पाण्यातून बाहेर आला. त्याच्या अंगातून कमळाचे फूल बाहेर आले. हे फूल कोणाच्या वाऱ्याला गेले, हा पहिला प्रश्न विचारलेला आहे. उंबराचे फूल आणावयास पाताळात गेलेल्या देवाला तेथे धरल्यानंतर त्याचे तोंड कोणत्या दिशेस होते हा दुसरा प्रश्न.

लौकिक विषयांशी संबंधित असे कूटप्रश्नही नाचाच्या वेळी कधीकधी विचारले जातात. अशा प्रश्नांची रे. ॲबटने[४] दिलेली दोन उदाहरणे खाली दिली आहेत.

प्रश्नः वाऱ्या पाण्यांनी मोट
कोनी रं बांधली,
जातीला जात मारी
मेला पुरुष वारा घाली

उत्तरः भाता, घण, ऐरण.

प्रश्नः माई लेकीना एक ओहोडास,
तूं आलशील कोधांड.
कोधांड नाहीं रं, खरांच मा आंखा,
खरा का खोटा देहीला सोद.
नाहीं तुला आल्यावर थेव,
घागऱ्यांना चाळ.

---

३. चापेकर नारायण गोविंद, 'बदलापूर' पुणे, शके १८८५, पृष्ठ १३३–१३४.

४. Journal of the Royal Asiatic Society (Bombay Br.) (Extra No.) 1905. P. 104.












उत्तरः लिखनी, दऊत, मायलेकी
त्यांना ओहोडास कोरा कागद.
[ ओहोडास–नवरा. आखशील-सांगशील. कोधांड–असत्य. आंखा–सांगितले. देहीला सोद–स्वतःला विचार. थेव–ठेव. ]

काही प्रश्न निव्वळ संवादरूप असून त्यामध्ये कूटाचा वा गोपनाचा भाग अत्यल्प असतो. उदा०– ' ऊस गोड की संगत गोड ? ' उत्तर–संगत.

कातकऱ्यांच्या कूटप्रश्नांचा वैशिष्ट्यपूर्ण प्रकार म्हणजे उखाण्यांचा होय. या प्रकारात प्रश्न विचारणारा आणि त्याचे समर्पक उत्तर देणारा अशा कमीतकमी दोन व्यक्ती आवश्यक असतात. प्रश्नामध्ये कल्पनेच्या साहाय्याने एखादी गोष्ट लपविली जाते. हे गोपन रूपक अगर श्लेष यांच्या आश्रयाने केलेले असून लक्ष्यार्थाला अभिप्रेत असलेला मूलार्थ उत्तर देणाराने शोधावयाचा असतो. गोपनासाठी प्राधान्याने रूपकाचाच आश्रय केलेला आढळतो. श्लेषाधिष्ठित उखाण्यांची प्रथा ही बरीच अर्वाचीन असून, अभिजात साहित्यातील कूटांच्या अनुकरणाने निर्माण झालेली दिसून येते.

कोणत्याही समाजातील उखाण्यांचे निरीक्षण केल्यास त्यात रोजच्या जीवनव्यवहाराशी निकटवर्ती असलेल्या गोष्टीच उखाण्यांचा विषय झालेल्या दिसून येतील. वृक्ष, फळे, पशू, कीटक, खाद्यपदार्थ, दागिने, अवजारे, सृष्टिव्यवहार, शरीरावयव व शरीरधर्म याप्रमाणेच व्यवहारात हरघडी उपयोगात येणाऱ्या बारीकसारीक वैशिष्ट्यपूर्ण वस्तूही गोपनाचा विषय होत असतात. कातकऱ्यांच्या उखाण्यांचे विषय हे त्यांच्या सांस्कृतिक पार्श्वभूमीशी निगडित आहेत. धनुष्य, कुऱ्हाड, इरले, नांगर, पागोटे, साडी, लंगोटी, लावेरे, दारवाण्डी, शिवण्डी, लुण्डी, सावरीची शेंग इत्यादी गोष्टींवर आधारलेले उखाणे हे त्यांच्या जीवनपद्धतीचे निदर्शक आहेत.

उखाण्यांची रचना ही प्रामुख्याने रूपकाच्या आश्रयाने केली जाते, हे वर सांगितलेच आहे. रूपक हा दोन वस्तूतील साम्यावर आधारलेला अलंकार आहे. सादृश्यातिशयाने एक वस्तू दुसरीशी अभिन्न आहे असे रूपकात सांगावयाचे असते. हा अभेद उपमेयावर उपमानाचा आरोप करून दिग्दर्शित केला जातो. काव्यात ज्यावेळी रूपकाचा उपयोग केला जातो, त्यावेळी उपमेय आणि उपमान या दोन्ही गोष्टी रसिकांसमोर हजर असतात. उखाण्यातून या जोडीतील पहिला घटक म्हणजे उपमेय हा लपविलेला असतो व उपमानाच्या पुराव्यावर त्यास शोधून काढावयाचे असते. उखाण्यातील रूपकांचा रचनेच्या दृष्टीने आणखी एक विशेष लक्षात येतो, तो म्हणजे उपमेय व उपमान यामधील साम्यशोधनासंबंधी. हे साम्य दोन प्रकारे शोधले जाते. एकतर ते रूपकनिविष्ट वस्तूंतील अंगभूत गुणामधील असते किंवा त्या वस्तूंच्या वैशिष्ट्यपूर्ण कृतीमधील असते. प्रस्तुत संग्रहातील क्रमांक १२ या उखाण्यात लावा पक्ष्याचा व खापरांचा रंग यामधील साम्य अभिप्रेत आहे; किंवा क्रमांक ३९ मध्ये केरसुणीचा विस्तार व दाढी यातील साम्य अभिप्रेत आहे. हा साम्यविचार पहिल्या प्रकारात मोडेल. क्रमांक २० मधील गाईचे ' बसून रहाणे ' व दाव्याचे ' चरावयास जाणे', किंवा क्रमांक ४० मधील पाव्याचे ' बोंबलणे ' या कृती साम्यविषय झालेल्या आढळतील. या साम्यशोधनातूनच पुढे रचना व कल्पनांचे संकेत निर्माण होतात. विविध समाजातील उखाण्याचा तौलनिक अभ्यास केल्यास असे अनेक संकेत आढळून येतील. प्रस्तुत संग्रहात अशा सार्वत्रिक कल्पनाबंधांचा वापर काही उखाण्यातून झालेला दिसून येतो. वणव्याचा अग्नी हा पांढरी गाय व मागे रहाणारी राख ही काळी गाय किंवा वासरू हा कल्पनाबंध भिल्लांच्या उखाण्यात रूढ असलेला दिसेल (५७). नांगराला जोडलेले बैल व शेतकरी यांच्या अवयवांच्या बेरजेने बनणारा आश्चर्यकारक प्राणी महाराष्ट्रात लोकप्रिय असलेला आढळेल (४५,४६). दिव्याची टाकी ही विहीर, वात ही वेल व ज्योत हे फूल ही सुंदर कल्पना अनेक समाजातील उखाण्यातून आढळते (३८). पाण्याला भिऊन उभी रहाणारी काळी गाय (पादत्राण) महाराष्ट्रात व भिल्लांमध्येही उखाण्याचा विषय झालेली आढळेल (३६).

रम्य कल्पकता व मनोहर रूपकांबरोबरच उखाण्यातून प्रासाला महत्त्व दिलेले आढळते. मराठी उखाण्यातील प्रासरचनेचे निरीक्षण केल्यास त्यातून वेगवेगळ्या शब्दातील विशिष्ट वर्णांच्या पुनरावृत्तीने निर्माण होणाऱ्या प्रासाखेरीज काही प्रासयुक्त शब्दबंधच वापर-

लेले आढळतात. खणखण, मणमण, घमघम, चमचम, चटचट, धडधड, सरसर, आगबाग, लाललाल, हिरव-हिरव, खूबखूब, गोडगोड, धोधो, आपटीदापटी, रघुरघु, औरसचौरस इत्यादी अभ्यस्त शब्द व पदे उदाहरणादाखल सांगता येतील. कातकऱ्यांच्या उखाण्या-तून प्रासरचनेचे कौशल्य कधीकधी सहज परिणत स्वरू-पात आढळते. क्रमांक ३९ चा उखाणा या दृष्टीने लक्षणीय आहे. हा उखाणा 'मुटीयेव्डा गडी, त्यानी सुपायेव्डी दाडी' असा असून त्याचे उत्तर 'केरसुणी' असे आहे. महाराष्ट्रात याचे पर्याय खालीलप्रमाणे आढळतात.

'मूठभर बाबा त्येला हातभर दाढी'
'मूठभर माणूस त्याला हातभर दाढी'

'मुठीएवढा बुवा त्याला सुपाएवढी दाढी'
–या उखाण्यातील गडी व दाडी हा प्रास बिनतोड आहे. दाढीच्या विस्ताराचे सुपाशी दाखविलेले साम्य हे कल्पनासामर्थ्याचा नमुना म्हणता येईल. आगबाग, आखआख, वाकुडीतिकुडी, सूपसोऱ्या, खान्दीखान्दी इत्यादी पदांतील प्रासही ठसकेबाज आहे.

कल्पनाचमत्कृती रूपक, श्लेष, प्रास इत्यादी विभ्रमांबरोबरच उखाण्यातील साम्यविषय झालेल्या वस्तू अगर त्यांच्या कृतीतील विसंगतीची जाणीव ही देखील आल्हादास कारणीभूत होत असते. 'गाय राहिली बसून आणि दावे गेले चरायला' यातील गाय व भोपळा; त्याचप्रमाणे दावे व भोपळ्याचा वेल यांच्यामधील अभेद दाखवून केलेल्या रूपकरचने-प्रमाणे 'दाव्याचे चरायला जाणे' या कृतीतील विसंगतीची जाणीव ही सूक्ष्म विनोदास कारणीभूत होते. उखाण्यांतील अशाप्रकारचे अतिशयोक्तिपूर्ण व विसंगतिमूल वर्णन हे त्यांच्या वेधकतेचे गमक आहे. अशा स्वरूपाच्या वर्णनाचा प्रारंभ मराठी उखाण्यांतून एवढासा, एवढीशी, लहानसे, छोटेसे या विशेषणांच्या आश्रयाने केलेला आढळतो. ( उदा० एवढेसे कारटे, एवढासा शिपाई, एवढीशी टिटवी, एवढाएवढा गडू, छोटीशी गुष्टी, लहानसे देऊळ इत्यादी). कातकऱ्यांच्या उखाण्यांतून देखील वडासा घड्ड (२), ओडीशी चिप् (४), वडीशी काड्की (२९), वडीशी सोहूरी (३०) अशी रचना आढळते.

अन्य लोकसाहित्यप्रकाराप्रमाणे उखाण्यातही विशिष्ट अंक वा अंकबंधांची पुनरावृत्ती झालेली दिसते. सात ( समुद्र ); दोन, तीन, चार, अथवा दहा ( पाय ); पाच ( वास ); तीन ( तोंडे ) या अंकसंकेताप्रमाणे आठ, बत्तीस, शंभर हे अंकही वारंवार वापरलेले दिसतात. कातकऱ्यांच्या उखाण्यात तीन ( शिपाई ), चार ( शिंगे ), पाच ( कुऱ्हाडी, कोयत्या), दहा (पाय), बत्तीस ( लाडू, पाय ) इत्यादी अंकाचा वापर झालेला आढळतो.

कातकऱ्यांच्या उखाण्यात ग्राम्यता व अश्लीलता विशेषत्वाने जाणवते. संपूर्ण लैंगिक व्यवहारांवर आधार-लेले उखाणे संकलनातून वगळले आहेत. मासल्या-साठी ठेवलेल्या उखाण्यात काहींची शब्दरचना अश्लील पण उत्तर साधे व सोज्वळ असलेले दिसेल (५, २५, ३२, ३४, ३५, ५०); तर काहीत रचना साधी पण उत्तर ग्राम्य आढळून येईल ( ९, १० ).

प्रस्तुत संग्रहात एकूण ५८ उखाणे असून त्यांचे संकलन शरीरावयव, शरीरधर्म, प्राणी ( पक्षी, कीटक, मासे, इत्यादी ), फळे–कंदमुळे व्यवहारोपयोगी वस्तू सृष्टिव्यवहार अशा विषयक्रमाने केलेले आहे. बहुतेक सर्व उखाणे कुलाबा जिल्ह्यातील कातकऱ्यांमधून गोळा केलेले असून, अजून पुष्कळच उखाणे मिळण्यासारखे आहेत. उखाण्यांचे लेखन बव्हंशी ध्वन्यनुसारी असून दन्तमूलीय व तालव्य अर्धस्फोटकातील फरक स्पष्ट करण्यासाठी तालव्य अर्धस्फोटकाखाली पोकळ टिंब दिलेले आहे. आवश्यक त्या शब्दांचे अर्थ व स्पष्टी-करणार्थ विस्तृत टीपाही जोडल्या आहेत. शक्य तेथे समान कल्पनेचे मराठी व भिल्ली उखाणेही दिलेले आहेत.

## उखाणे

### १

टेपावर् घरा, उग्डी बारा. ( **नाक्** )

[ टेप्–उंचवटा; बारा-दारे. तोंड हा उंचवटा, त्यावर नाक हे घर व नाकपुड्या ही दारे. ]

या उखाण्याचे मराठी पर्याय कुलाबा व सातारा जिल्ह्यात अनुक्रमे खालीलप्रमाणे आढळतात.

'साता समुद्रापलिकडे राजाने बांधली घरे त्याला दोनच दारे.' ( एक होता राजा : भाग ६ पृष्ठ ८३ )











'टेकावर घर, उघडी दारे' ( एहोरा : ६·९८ )

२

वडेसे घड्डमा बत्तीस् लाड्डू. ( मुंहात्ला दात् )
[ वडेसे–एवढ्याशा ; घड्ड–गड्डू. ]

३

काली घोडी लगाम् तोडी, नवखण्ड् काशी उडाण् मारी, उडाण् मारीहीन् ती एक्या शेकन्दात् आनी ( नदर् )

[ नवखण्ड् काशी—कातकऱ्यांचा एक भौगोलिक संकेत, सारे जग काशीसह नऊ खंडांत विभागलेले आहे अशी कल्पना;

शेकन्द्-सेकंद. संस्कृति–साहचर्याने भाषेत नवनवीन शब्द शिरून ते लोकसाहित्यातही कसे स्थिर होतात याचे हा शब्द चांगले उदाहरण आहे. ]

या उखाण्याचा मराठी पर्याय, 'इथे होती तिथे गेली' असा नाशिक जिल्ह्यात आढळतो. ( एहोरा : ६·९१ )

भिल्लांमध्येही याच कल्पनेचा उखाणा आढळतो. 'It went, it came' (sight) (Naik T. B. - The Bhils, A study P. 305) गुजराथमधील गामीत लोकातही अशाच अर्थाचा उखाणा आढळतो. (Shah P. G. – Tribal life in Gujarat P. 235)

४

ओडीशी चिप् ; माला नाय् उप्टायुज तुला नाय् उपटायुज. (नक्) [चिप् – चप्पट दगड; उप्टायुज–उपटवत; नक् – नख. ]

५

तुला पाच्जन् फूगूवत् आन् दोन्जन् निजुवत्. ( हाताना पाच् बोटां आन् दोन् डोळां )

[ पाच बोटांनी अन्न खाल्ल्याने माणूस फुगतो आणि दोन डोळ्यांनी तो निजतो. ]

६

धर् शेण्डी आपट्. ( शेम्बूड् )
[ शेण्डी— नाकाची बोंडी. ]

७

हाताकाल् धरूं आन् भुईवर् आफ्लूं. ( शेम्बूड् )
[ हाताकाल्— हाताच्या साह्याने; आफ्लूं – आपटू. ]

८

तिड्कने टन्का हे आन् सावलीने मरह. (अङ्गाना घाम )

[ तिड्कने–उन्हाने; टन्का हे–तरूण होतो. उन्हाने घाम वाढतो व सावलीला मरतो, म्हणजे नाहीसा होतो. ]

९

पेण्ढामा लिहीन् गुजर् टाकू. ( हग् )
[ पेण्ढामा -भाताच्या सुक्या काड्यामध्ये; लिहीन्–घेऊन. गुजर आणि गू या शब्दातील साधर्म्य साधून श्लेष करण्याचा प्रयत्न केला आहे. ]

१०

येक् रह्ना भुईमा मुडी, येक् ग्यां वर्ल्यां उडी आन् येक् ग्यां जमीन् फोडी. ( हग्, पाद्, मूत् )

[ भुईमा मुडी रह्ना–जमिनीवर वेटोळे घालून राहिला; ग्यां– गेला; वर्ल्यां–वरच्यावर. ]

११

घाटावर्ना आनी हिज्डी; तिनी वजाभर् लुग्डी पन् गाण्ड् का उग्डी ? ( कुकूडी )

[ आनी–आली; तिनी–तिची; कुकूडी–कोंबडी. ] मराठीत समान अर्थाची 'सतरा साडे तरी भागूबाईचे कुले उघडे' अशी म्हण आढळते.

१२

मोटे माळावर् खाप्ऱ्याना ढीग्. ( लाव्रा )
[ लाव्रां— लावा पक्षी

माळरानात समुदायाने बसलेली लावरे खापऱ्यांच्या ढिगासारखी दिसतात. ]

१३

मातेरावर् हिनी चोरी, डोल्कराहाने हेरा, चिमूटकराहानी धरा, नक्लकरानी मारा. ( जू )

[ हिनी— झाली, हेरा— पाहिले; जू— ऊ. या उखाण्यात मातेरा– माथा, डोलकर्– डोळे, चिमूटकर– चिमूट, नक्लकर–नख असा श्लेष साधण्याचा प्रयत्न केला आहे. ]

याच कल्पनेशी साधर्म्य असलेले उखाणे मराठवाडा व सातारा जिल्ह्यात अनुक्रमे खालीलप्रमाणे दिसून येतात.

' शिरापूरचा राजा कानपूरला उतरला. हात्तलकऱ्यांनी धरला, नक्कलकऱ्यांनी मारला. ' ( एहोरा : ६·१०१ )

'केसकरांची लेक, बोटकरांना दिली. तळेगावात ठेवली, नखेरावानी मारली.' ( एहोरा : ६·९९ )

१४

बिसह तट थापड्या कुटह. ( माक् )

[माक् – माशी. ही बसते तेथे हात चोळते, म्हणजे टाळ्या वाजवते. ]

१५

वाकुडा तिकुडा येल् त्यावर् पोप्टाना खेल्. ( किर्डां )

[ येल् – वेल; किरडां – पतंग ( कीटक ). दिव्याची ज्योत ही वेल व तिच्यावर झेपावणारे पतंग हे पोपट.]

१६

आत् शिवन् , बाहेर् वासा. ( दार्वाण्डीना घर् )

( दार्वाण्डी – एक विषारी कीड. घराच्या छप्परास आत वासे असून ते बाहेरून शाकारलेले असते. दार्वाण्डीच्या घरास बाहेर काटक्या असून ते आतून शिवलेले असते. ]

१७

बारा शिङ्गा बत्तीस् पायू , उडत् पक्षा बुडत् जायू ( शिवूण्डी )

[ पक्षा – पक्षी, शिवूण्डी – एक प्रकारची लहान मासळी, काळी कोळंबी. हिला अनेक पाय व मिशा असून पाण्यातून हवेत उसळी मारण्यात पटाईत असते. ]

१८

मोठे कडांला ढोङ्गी डोशी चढह. ( शिवूण्डी )

[ कडा– डोंगराचा कडा; ढोङ्गी-पोक आलेली; डोशी-म्हातारी ; शिवूण्डी-काळया रंगाची लहान आकाराची तुडतुडी कोळंबी. ही पाण्याच्या धारेवरून कड्यावर चढत जाते. ]

१९

खास् खनी तपिली दपह. ( कासव् )

[ 'खाच खणून तपेली लपते ; कासव जमिनीत खड्डा उकरून त्यात काही महिने दडून रहाते. ]

२०

गाय रहूनी बिशीन् आन् दावा ग्यां चरूला. ( कोहोळ् ).

[ बिशीन् – बसून; कोहोळ्-भोपळा. भोपळा जाग्यावर; पण वेल पसरतो. ]

कुलाबा व नाशिक जिल्ह्यातील शेतकऱ्यात या उखाण्याचे अनुक्रमे खालील पर्याय आढळून येतात.

'म्हैस राहिली बोडणात, दावा गेला चरायला.' (एहोराः ६. ८५ )

'बैल बसतो, कासरा चरतो.' ( एहोराः ६. ९३ )

२१

सूपू सोऱ्या लाम्ब दोऱ्या, पोट्फुगीना माना पोऱ्या. (कोहोळ्).

(सूपू सोऱ्या – प्रासपूरक पद; माना–माझा. ]

२२

मा आनाहा, बाबा येहे आन् बयू पोटामा आहा. ( आम्बा )

[ मा– मी. आंब्याचा मोहोर हा लेक, तो आला. बाप हा आंबा, तो येत आहे. आई ही बाठी, ती पोटातच आहे. ]

२३

आयुस गोधुडी, बाहास् खिसा; त्याहून्या पोटी तीन् इसा. (फनस्)

[ बाहास् – बाप; त्याहून्या – त्यांच्या; तीन् इसा– तीन वेळा वीस, साठ. फणसाचे बाह्यांग गोधडीसारखे दिसते, ती आई; गरा हा खिशासारखा, तो बाप; व गऱ्यातील आठळ्या ही मुले ]

मराठवाड्यात या उखाण्यातील कल्पनेशी किंचित् साधर्म्य असलेला उखाणा प्रचलित आहे, तो असा– ' बाप खरबुडा, आई चिंध्या भरी, लेक शहापरी. '

–( एहोरा : ६ – १०१ )

२४

आगूजनी बागूजनी, बाग्यामध्ये चौगीजनी; हिर्वा लिम्बू कुङ्कूवावानी. ( कलीङ्गन् )

[ आग्जनी बाग्जनी– एक पूरक प्रास ( ? ) मराठीत हाच प्रास ' आगदाणी बागदाणी ' या स्वरूपात आढळतो. मूलतः हे 'आग झणी बाग झणी' असे शब्द असावेत. त्यांचा अर्थ क्षणात आग ( लाल रंगाची निदर्शक ), तर क्षणात बाग ( हिरव्या रंगाची निदर्शक ) ' असा होईल. मराठीमधील पर्यायी उखाणा ' आगदाणी बागदाणी, बागेत पडल्या चौघीजणी ' असा असून त्याचे उत्तर ' नागवेलीचा पानविडा ' किंवा ' पोपट ' असे आढळते. ( बाबर डॉ. सरोजिनी–मराठीतील स्त्रीधन पृ. १७४ ). बागेमध्ये पडणाऱ्या चौघीजणी म्हणजे ' सुपारी, कात, चुना व लवंग ' ह्या होत. ]

## २५

भट् आकह भट्नीला, शेटा उपट् चकूनीला; चकूनी हिनी तिकट् ; आजून् दोन उपट् ( **कान्दा** ).

[आकह-सांगतो ; शेटा–लक्ष्यार्थाने कांद्याचे ऊळ ; चकूनी–चटणी; हिनी झाली. ]

## २६

झुरडास् टेमूका ( **वाङगा** )

[ झुरूड्–झुबका ; टेमूका–टेंगूळ. वांग्याच्या झाडाला प्रत्येक झुबक्यास टेंगळासारखे वांगे येते. ]

## २७

झुरूडास् खशा. ( **मिरची** )

[ खशा–डेख, बुडखे. मिरचीच्या प्रत्येक झुबक्यास तयार झालेल्या मिरच्या तोडल्याने, खशा म्हणजे बुडखे शिल्लक राहिलेले असतात.]

## २८

घाटावर्ना आना भट्, त्याला लागूनी ठेस्, त्याने काळ्जाला केस्. ( **सावरीचा दोडा** )

[ ठेस् लागूनी– ठेच लागली; त्याने– त्याच्या; दोडा– शेंग. सावरीच्या शेंगेतील कापूस हे काळजाला आलेले केस. ]

## २९

वडेसे काड्कीवर् बतीस् लोक्. ( **भाताचि आङगर** ).

[ वडेसे— एवढयाशा; काड्की— काटकी; आङ्गर्— लोंब. ]

## ३०

वडीसी सोहूरी बार् लावी नाचह. ( **आनज्** )

[ ' एवढीशी मुलगी दार लावून नाचते. ' सोहूरी–मुलगी; बार्– दार; आनज्– भात. झाकण ठेवलेल्या भांड्यात उकळणारा भात ही नाचणारी मुलगी. ]

## ३१

बाहास् वलक् दाण्डा, आयूस् कन्कीना वण्डा, त्याहूने पोटी काळ्तोण्डा. ( **काळा तीळ्** )

[ बाहास्–बाप; वलक्–ओळख; कन्कीना वण्डा–कणकीचा उंडा, गोळा; त्याहूने–त्याच्या.

तिळाचे रोपटे ताठ असून, बोंड किंचित् गोलसर असते व त्यात काळ्या रंगाचे तीळ असतात. ]

या उखाण्याचा मराठी पर्याय ' आई हळदीचा उंडा, बाप कुराडीचा दांडा, ल्योक जलमला काळतोंडा' असा आढळतो. ( मराठीतील स्त्रीधन पृ. १७६ )

## ३२

वडीशी सोहूरी बुरूडा ली. ( **लुण्डी** ).

[ सोहूरी – मुलगी; बुरूडा – गुह्य भागावरील केस; ली – धारण करते; लुण्डी – कनकाच्या आकाराचा तंतुमय कंद किंवा मुळकुंडी. हिला ' उळूस् ' असेही म्हणतात. ]

## ३३

भोवूत्याच् बाजार् भर्ना, मदी भर्नेलज् नाय्. ( **साळू** ).

[ ' सभोवती बाजार भरला; मध्ये भरलाच नाही.' साळू-पागोटे. ]

## ३४

आईस्ना सुपा ओडा आन् बाहास्ना बोटा ओडा. ( **चिन्दी उर्माल्** ).

[ ओडा – एवढा; चिन्दी – साडी; उर्माल् – लंगोटी. ]

## ३५

तुने आईसूने भोकात् कुदळा. ( **नत्** )

[ कुदूळा – जमीन खणण्याचे एक हत्यार; नत्–नथ. ]

३६

काळी गाय्, पान्याला हेरी उभी राय्. ( **पाय्तान** )

[ हेरी-पाहून; उभी राय्- उभी राहते. ओढा ओलांडताना पादत्राणे हातात घ्यावी लागतात. ]

या उखाण्याचा मराठी पर्याय खालीलप्रमाणे आढळतो.

'काळी गाय काटक हाय, पानी बघून उभी ऱ्हाय.' (मराठीतील स्त्रीधन पृ. १७६ )

भिल्लामध्येही हाच कल्पनाबंध रूढ आहे. 'A calf gets afraid, whenever it comes to water' (The Bhils– A Study : P. 306).

३७

तीन् शिपाई, एक् वजा ले चाल्त्. ( **चूल्** )

[ वजा ले चाल्त्-ओझे घेऊन जातात. चुलीचे तीन दगड हे तीन शिपाई. ]

३८

आख् आख् बाव् हेर; बावीमा येल् हेर्, येलाला फूल् हेर् . ( **दिवा** )

[ आख् आख्- सांग सांग; बाव् - विहीर, हेर् - पहा; येल् - वेल. दिवा ( चिमणी ) ही विहीर, दिव्याची वात ही वेल व ज्योत हे वेलीवरील फूल. ]

याच कल्पनाबंधाची मराठी उखाण्यांतून योजना केलेली आढळते.

'आज घरात माजघर, माजघरात विहीर, विहिरीवर वेल, वेलावर फूल. ( समई, वात, ज्योत ) – ( मराठीतील स्त्रीधन पृ. १७६ )

'आई आई विहीर बघ, विहिरीत वेल बघ, वेलाला फूल बघ. ( कंदील, दिवा ) – ( एहोरा : ६·७५ )

३९

मुटीयेव्डा गडी त्यानी सुपायेव्डी दाडी. ( **बाहारी** )

[ 'मुठीएवढा गडी, त्याची सुपाएवढा दाढी.' बाहारी-केरसुणी. ]

केरसुणीचा बुंधा व विस्तार यांचे बुवा व त्याच्या दाढीशी एकरूपत्व दाखविणारे रूपक महाराष्ट्रभर लोकप्रिय दिसते.

'मूठभर बाबा त्येला हातभर दाढी.'

– ( एहोरा : ६·७८ )

'मूठभर माणूस त्याला हातभर दाढी.'

– ( एहोरा : ६·९० )

'मुठीएवढा बुवा त्याला सुपाएवढी दाढी.'

– ( एहोरा : ६·९९ )

४०

मोटे माळावर् टाल्या बाम्बन् बोम्बूलह. ( **पावा** )

[ टाल्या बाम्बन् — टक्कल पडलेला ब्राह्मण. कातकऱ्यांच्या पाव्याला वारल्यांच्या 'तारप्या'-प्रमाणे दुध्या भोपळा पोखरून जोडलेला असतो. त्याचा पृष्ठभाग टक्कल पडल्याप्रमाणे दिसतो. ]

४१

उग्डा ताम्ब्या बोम्बा ठोकह. ( **घाट्** )

[ घाट्–घंटा. घंटेचे तोंड तांब्याप्रमाणे आवळ नसते म्हणून तीस उग्डा ताम्ब्या म्हटले आहे. ]

ह्याच कल्पनेशी जुळणारा उखाणा मराठीत आढळतो.

' उपडा गड्डू, थांबून थांबून बोंब मारी ' (शाळेतील घंटा). –( एहोरा : ६· ८४)

४२

आत् हाड्क्, हाड्कावर् कातडी, कात्डीवर् आत्डी. ( **इर्ळां** )

[ इर्ळां–इरले. याचा सांगाडा वेळूच्या कांबींचा असतो, ती हाडे; त्यावरील पाने ही कातडी व पानांवरील दोरांचे बंधन ही आतडी. ]

४३

जाताना फुगीयूज, येताना वहटायूज. ( **धनु** )

[ धनु–धनुष्य. शिकारीला जाताना धनुष्याची दोरी त्याच्या खाचांतून अडकविल्यामुळे ते ताणले जाते व फुगलेले दिसते. येताना दोरी काढलेली असल्याने ते ओहोटलेले दिसते. ]

४४

भुज्नेल् कुक्डा खान्दी खान्दी हिण्डह. ( **कुराडा** )

[ भुज्नेल्- भाजलेला; कुक्डा- कोंबडा; कुराडा- कुऱ्हाड.

आगीत पोळलेला कोंबडा घाबरून झाडाच्या फांद्यांवरून उड्या मारीत सुटतो, त्याप्रमाणे आगीत तापवून तयार केलेली कुऱ्हाड फांदींफांदीवर चालविली जाते. ]

४५

वाकुडी तिक्डी लहूनाय्, तीन् बोच दहा पाय्. ( **नाङगोर्** )

[ लहूबाय्— कातकरी लोकसाहित्यात सर्रास आढळणारे एक सांकेतिक व्यक्तिनाम. लहूबाळ हेही नाव आढळते. ]

नांगराचे बैल व शेतकरी यांच्या अवयवांच्या गणनेवर आधारलेले उखाणे सर्वत्र आढळतात. नांगरांच्या प्रकारावर गणनेचा अंकही बदलतो.

'वाकडकेके वाटेने जाय, तीन डोकी दहा पाय.' –( एहोरा : ६·७६ )

'ढेकूमेकू माती खाय, तीन × ×, दहा पाय, तीन तोंड, दो शेपा,'. – ( एहोरा : ६·९६ )

'अरंगत कोंबडा तरंगत जाय, सोळा शिंगे बत्तीस पाय'. – ( एहोरा : ६·७९ )

४६

चार् शिङ्गा आन् येक् हात् ( **नाङगोर्** )

[ नांगराची चार शिवळे ही चार शिंगे व लुमणी हा हात. ]

४७

उभे कराटीज् चाल्ह. ( **होडी** )

[ कराट् – कणा. होडी चालताना प्राण्यांप्रमाणे तिच्या देहाची हालचाल होत नसल्याने ताठ कण्याने चालते अशी कल्पना. ]

४८

आदी त्यापा जाहास, मङ्ग् तू म्होर कसव् हूं जाहास्. ( **बार्** )

[त्यापा– त्याच्यापाशी; कसव् हूं– कोठेही; बार्-दार. कोणतेही करण्यास घराबाहेर पडण्यापूर्वी दाराजवळ जावे लागते. ]

४९

दादा बुडह पन् दादानी साल्‌ नाय् बुडह. ( **ताकानी शाय्** )

[ साल्‌ – पागोटे; शाय् – लोणी. ताक बुडते; पण लोणी बुडत नाही. ]

५०

ढेङ्ग् मारी कच्‌का ( **बेडां** )

[ बेडां – बेजे, कुंपणास ठेवलेली वाट. बेज्याच्या डेलकीच्या आकाराच्या खुट्यावरून ढेंग टाकून जावे लागते. ]

५१

शेत्‌भर मण्डाना एकुज् लेण्डा. ( **भातानी मळ्‌नी** )

[ मण्डा–पसारा. शेतभर पसरलेले धान्य एकत्र केल्यावर मळणी (उडवे) अतिशय लहान दिसते. ]

५२

अट्टून दोरी सडक्‌नी; पुन्याला जाऊन् अडक्‌नी. ( **वाट्** )

[ अटून्– येथून; सडक्‌नी– सटकली; सुटली; अडक्‌नी–आडकली. ]

५३

तूं बाजारामा जाहास् त पयुला काय् खाहास्? ( **धकाण्डी** )

[ तू बाजारात जातोस तर प्रथम काय खातोस? ]

५४

खाल् तीन् पाय्, त्यावर दोन् पाय्, पुरुस् पुरशानी वाट् पाहाय्. ( **वारा** )

[ खाल्–खाली.

घाटावरच्या मळणीचा देखावा. तीन पायांच्या घडवंचीवर उभा राहून शेतकरी वाऱ्याची म्हणजे दुसऱ्या पुरुषाची वाट पहातो. ]

५५

आईस्‌नी आदी लेकीस्‌ला धवह. ( **पाऊस्** )

[ आदी– आधी; धवह– आंघोळ घालतो. पावसाळ्यात अगोदर ओढे वहातात, मग नदीस पाणी चढते. ]

५६

पाच् कुराडा पाच् कोयत्या; तरी नाय् तुट उम्ब्रानी साल्. ( **झाडानी सावली** )

[ उम्ब्रानी साल्– उंबराची साल. ही फार चिवट व चिवट असते. ] या उखाण्याशी साधर्म्य असलेला उखाणा कुलाबा जिल्ह्यातील शेतकऱ्यांत प्रचलित आहे.

'आठशे कुऱ्हाडी नऊशे भाले, नाय तुटत उंबराची साले.' – ( एहोरा : ६·८४ )

खानदेशातील उखाण्यात उंबराच्या साली ऐवजी हिवराचा पाला आढळतो. हिवराच्या झाडाखाली बसू नये असा संकेत आहे.








'बत्तीस कुऱ्हाडा बत्तीस भाला, ना तुटे हिव्वरंना पाला.' (एहोराः ६·९६)

५७

काळी गाय् बिसत् जाय्, पाण्डरी गाय् चरत् जाय्. (वनूवा)

[वनूवा- रानास अगर डोंगरास लागलेली मोठी आग, पेटत जाणारा वणवा ही पांढरी गाय; तर मागे उरणारी काळी राख ही काळी गाय.]

वणवा आणि गाय यांचा संबंध जोडणारा कल्पनाबंध भिल्लांतही प्रचलित आहे.

'A grazing cow goes forward and its black calf follows sucking it.'

'The white cow goes on delivering, the black calf moves on dying.'

— The Bhils, A Study P. 306

कुलाबा जिल्ह्यातील शेतकऱ्यात 'तांबडी गाय चरत जाय, काळी गाय बसत जाय' असा पर्याय आढळतो. –(एहोरा : ६·८४)

५८

आता आना आन् आवूशीना ग्यां.
(भरतीना पानी)

[आना– आला; आवूशीना– सायंकाळी; ग्यां– गेला.]

---

भाई माधवराव बागल

# गांधीवादाचे राजकीय भाष्यकार–

# समन्वयी आचार्य जावडेकर

आज आचार्य नाहीत!!

पण अशा थोर विभूतीचे प्रेम सहवास सहकार्य आणि संकटकाली आधार आणि पाठिंबा मला मिळू शकला हे लिहिण्यास मला किती अभिमान वाटतो. वयाने मोठे नव्हेत पण त्यांच्या विद्वत्तेचा विचार केला म्हणजे त्यांच्या पायाजवळही बसण्याचा मला अधिकार नाही.

पण तो अधिकार मला त्यानी दिला.

आपल्या मोठेपणाची जाणीव त्यांनी– त्यांच्या माझ्या सहवासात मला कधीही भासू दिली नाही.

बरोबरच्या नात्याने वागवले, बोलले, हातात हात घालून सहकार्य केले. माझ्या जीवनात त्यांच्या सत्संगतीची केवढी मोलाची भर पडली. ती कोण काढून घेणार !

गेले ! पण बहुमोल असा वैचारिक ठेवा स्वाधीन करून गेले केवढी अक्षय संपत्ती बहाल करून गेले.

* 'आध्यात्मिक आदर्शवाद आणि राजकीय वास्तववाद याचा समन्वय साधल्यावाचून शुद्ध लोकशाही किंवा म. गांधी जिला अहिंसाधिष्ठित लोकशाही असे नाव देतात ती निर्माण होणार नाही.' *

या वाक्यात ती संपत्ती गोठलेली आहे.

## ओळख

आचार्य जावडेकरांचे व माझे संबंध १९३० सालापासूनचे. प्रथम एकमेकात वैचारिक आकर्षण निर्माण झाले आणि लोहचुंबकाने ओढून घ्यावे त्याप्रमाणे त्यानी मला ओढून घेतले. त्यानीच तशी इच्छा प्रकट केली. याला कारण झाले. मी १९३१ साली लिहिलेले 'नव्या पिढीचे राजकारण' हे पुस्तक. समाजवादी विचारसरणीचे महाराष्ट्रातील मराठी भाषेतील हे पहिलेच पुस्तक. हे पुस्तक शंकररावजी जावडेकर व शंकरराव देव या दोघानाही फार आवडले व तशी त्यांची मला पत्रे पण आली.

आचार्य शंकरराव जावडेकर लिहितात:— "या पुस्तकातील विचार सत्यशोधक समाज, ब्राह्मणेतर जनता व एकंदर महाराष्ट्र याने ग्रहण केल्यास महाराष्ट्राच्या कर्तृत्वास योग्य दिशा लागून त्याच्या चालू इतिहासास नवे वळण लागेल. विशेषतः गांधींचा अहिंसावाद व कम्युनिझम् याची जी जोड या पुस्तकात दृष्टीस पडते, ती माझ्या मते फार महत्त्वाची आहे."

आणि त्याचबरोबर त्यांचे परमस्नेही सहकारी व महाराष्ट्राचे गांधीवादी पुढारी शंकरराव देव याचेही आले. ते लिहितात :–

"आपण प्रकट केलेले उदात्त सात्त्विक व खोल विचार यानी आम्हा सर्वांना आपण फार निकट बनवले आहे. हे विचार आचारात उतरविण्यासाठी काही संघटनात्मक कार्य महाराष्ट्रात व्हावे अशी आम्हा सर्वांची मनापासूनची इच्छा आहे."

शंकरराव जावडेकर व देव यांची मैत्री अत्यंत गूढ अशी होती. परस्परात कमालीचा जिव्हाळा होता. तो आचार्यांच्या अंतापर्यंत टिकला.

आचार्य जावडेकरांनी मला 'आपण शक्य झाल्यास मजकडे येत जा. आपल्याला विचार करता येईल. संघटनात्मक कार्याचाही विचार करता येईल' असे सांगावे पाठवले. ज्यांना एस्. एम्. जोशी, नानासाहेब गोरे, रावसाहेब व अच्युतराव पटवर्धन गुरु मानतात, त्यांचा सहवास मिळणे म्हणजे केवढी भाग्याची गोष्ट; मी इस्लामपूरला त्यांच्या राहत्या घरी जाऊ लागलो. तेथे राहू लागलो. त्यांच्या ज्ञानाबरोबर त्यांच्या लोभाचाही वाटा मिळू लागला. विश्वविद्यालयीन शिक्षणाहूनही उग्र आणि माझ्या ध्येयाला व विचाराला अनुकूल असे शिक्षण आणि मार्गदर्शन, मला मिळू लागले. त्यांची बसण्याची, लिहिण्याची व वाचन करण्याची जागा एकच होती. खोलीत बिछान्याशेजारी रॅक्सवर मराठी इंग्रजी व संस्कृत राज्यशास्त्राची पुस्तके खच्चून भरलेली असत. रात्री लागलेच एखादे, तर चटकन हाताला लागावे. दम्याच्या आजारामुळे त्याना फिरणे वगैरे होत नसे. घरीच पडून रहावे लागे. त्यामुळे वाचन व लेखन हाच व्यवसाय, हीच






विश्रांती व हीच त्याना एकमेव करमणूक होती. त्यांच्या सुशील सेवारत पत्नीने प्रेमाने व अगत्याने पुढे ठेवलेले अन्न, मला सेवन करता आले ही माझी पुण्याई.

## आठवणी

वादविवादात अगर घरगुती बाबतीत म्हणा त्यांचा स्वभाव आग्रही नव्हता. दुसऱ्याचे विचार शांतपणे ऐकून घेऊन त्यातले काही घेता आले तर ते घेण्यात, त्यांना कधीही कमीपणा वाटला नाही.

शंकरराव जावडेकर, हे शांत सागरासारखे ! आतून वहाणाऱ्या शांत जलप्रवाहाप्रमाणे, आपले विचार मांडणार, त्यांची भाषा म्हणजे, वाऱ्याच्या शीतल झुळके बरोबर, खाली पडणारी पारिजात पुष्पांची वृष्टीच जणू. चेहऱ्यावर राग चीड या भावना जराही दिसणार नाहीत. दुसऱ्याची मते खोडून काढण्याचा अट्टाहास न धरता, आपले विचार जेवढे सुस्पष्ट करता येतील; तेवढा करण्याचा प्रयत्न करणार. पक्षीय पुढाऱ्याप्रमाणे, त्यांच्या भाषणात चढेलपणा जराही दिसून येणार नाही, विरोधी मताबद्दलही आदर बाळगून बोलणार. यामुळे जावडेकरांनी आपल्या आयुष्यात एकही शत्रू निर्माण केला नाही. समन्वय साधण्याचा सतत प्रयत्न केला आहे. ते समन्वयी होते. टिळक व आगरकर या दोघानाही ते पूज्य मानत. जावडेकरांच्यात दोघांच्या विचारांचा समन्वय झाला होता. एकांगी हेकेखोरपणा नव्हता. टिळकांचा प्राचीन संस्कृतीचा अभिमान व कडवा राष्ट्राभिमान व आगरकर आणि फुल्यांची सर्वांगीण सुधारणेची तळमळ व पाश्चात्यांच्या ज्ञानाचे अभ्यासू रसग्रहण, आचार्यांच्या विचारात, लिखाणात व आचारात आढळून येते.

कोरगावकर ट्रस्टच्या संमेलनात ते बोलू लागले म्हणजे त्यांचा प्रत्येक शब्द ऐकून घेण्याकरता श्रोत्यांची हालचाल, कुजबूज, एकदम बंद होणार !

अरेरे ते दिवस आता कुठले यायला !!!

आचार्यांचे भाषण म्हणजे अमृताच्या धारा ! त्यातून गांधीवादाचा निर्मळ आणि सात्त्विक प्रवाह वहात असे. गांधीजी, अहिंसावाद बोलून गेले. तो राजकारणात आणण्याची त्यानी जीवेभावे खटपट केली. त्या गांधीवादाला शास्त्रीय स्वरूप देण्याची महनीय कामगिरी केवळ आचार्य जावडेकरांनी केली. 'आधुनिक-भारतासारखा' भारताचे, अहिंसा तत्वज्ञानानुसार मार्गदर्शन करणारा, सर्व जगाला उपकारक असा हा ग्रंथ लिहून शंकरराव अमर झाले आहेत.

गीतारहस्यानंतर त्याच तोलाचा, त्यात पुनः अनुभवाची भर पडलेला, हा ग्रंथ ठरेल.

* 'मानवी समाजाची पूर्णतेची स्वप्ने कधीकाळी यशस्वी व्हायची असतील तर अहिंसेच्या साधनाचा विकास होत गेला पाहिजे.' *

— असे त्यांचे मत होते.

* 'सत्याग्रही भारतच जगाला वरील मूल्यांचा लाभ करून घेण्याचा मार्ग दाखवू शकेल.' *

— अशी त्यांची दृढ श्रद्धा होती.

अशी थोर व्यक्ती मला मित्र म्हणून लाभावी हे केवढे भाग्य माझे ! जावडेकरांच्या मैत्रीचा, सहवासाचा व विचाराचा लाभ भरपूर करून घेता आला.

प्रजापरिषदेच्या सुरवातीपासून, त्यांच्या विचाराचा व मार्गदर्शनाचा फायदा होत गेला. प्रजापरिषदेच्या संघटनेचा उपयोग मी अहिंसावादी—समाजवादाचा प्रचार करण्यात करून घेतला. प्रजापरिषदेचे ध्येय जरी 'राजाच्या आधिपत्याखाली जबाबदार राज्यपद्धती' हे असले तरी माझी व्याख्याने असायची समाजवादी विचारसरणीची. यामुळे कोल्हापूरच्या राजकीय चळवळीला, साताऱ्याप्रमाणे घातपाती चळवळीचे स्वरूप आले नाही. जे काही प्रकार झाले ते अनधिकृत होते. अन् त्यावेळी मी तुरुंगात होतो. तेथूनही मी या प्रकाराला माझी मान्यता दिली नाही. व महात्माजींना ही चळवळ मान्य असणे शक्य नाही असे पत्रही धाडले होते. तुरुंगातून सुटल्यानंतर माझाच कयास खरा ठरला व गांधीजींनी या घातपाती चळवळीला आपली मान्यता नसल्याचे जाहीर केले.

कोल्हापुरला मी 'अखंड-भारत' म्हणून प्रभाकरपंत कोरगावकर यांच्या साहाय्याने जे साप्ताहिक काढले त्यात आचार्य जावडेकर आपले लेख देऊ लागले. व पुढे दुय्यम संपादकत्वही पतकरले. त्यांचे ते लेख एकत्रित करून माझ्या प्रेसमध्ये ते पुस्तक रूपाने प्रसिद्ध केले. त्याला प्रस्तावनाही जावडेकरानीच लिहिली ते लिहितात :








"क्रांतिकारक अहिंसावाद' ही लेखमाला प्रथम अखंड भारतात प्रसिद्ध करून व नंतर पुस्तकरूपाने प्रसिद्ध करून भाई बागल यांनी माझ्यावर उपकार केले आहेत. पुढे केव्हा तरी या विषयावर अधिक विस्तृत लिहिण्याचा माझा विचार आहे. तूर्त विचारी वाचकांपुढे मी एका विषयाचा केवळ उपन्यास सादर करीत आहे'.

इस्लामपूर ( जि. सातारा ) शं. द. जावडेकर

प्रत्यक्ष कृतीनेही मी मजवर झालेल्या खुनी हल्याला, अहिंसेनेच तोंड दिल्याचे पाहून तर जावडेकरांचा माझ्यावर फारच लोभ जडला. त्यानी मला अनेक पुस्तकांच्या भेटी दिल्या. त्यातल्या काही नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे मागून नेलेल्यापैकी परत आल्या नाहीत ! तरी काही आज माझ्या संग्रही आहेत. त्यांची मी अनेकवेळा पारायणे करून तांबड्या खुणांनी त्यातली पाने भरली आहेत. त्यांच्या पुस्तकांची यादी बरीच मोठी होईल. पण मजकडे आहेत ती :—

(१) आधुनिक भारत (२) राजनीतिशास्त्र परिचय (३) समाजवाद आणि सर्वोदय (४) आधुनिक राज्यमीमांसा भाग पहिला व दुसरा (५) लोकशाही (६) हिंदु-मुसलमान ऐक्य (७) गांधीवाद (८) महायुद्ध आणि राष्ट्रसभा (९) शास्त्रीय समाजवाद (१०) क्रांतिकारक अहिंसावाद.

अशा रीतीने सहवासामुळे 'अखंड-भारत' साप्ताहिकास दिलेल्या सहकार्यामुळे आणि विचारधनाचा मला वाटेकरी केल्यामुळे ते अधिकाधिक जवळ येत गेले.

यानंतर मजवर गुदरलेल्या-म्हणण्यापेक्षा ओढवून घेतलेल्या प्रसंगामुळे, ते फार अस्वस्थ झाले. तो प्रसंग मी केलेल्या नऊ दिवसाच्या अन्न सत्याग्रहाचा.

कोल्हापूर दरबारच्या नोकर लोकानी पगारवाढीसाठी संप जाहीर केला होता......या संपाने फार मोठी मजल गाठली होती. हिंदुस्थानच्या इतिहासात नामनिर्देश करण्याजोगा हा संप होता. संपामुळे राज्याच्या कारभाराला खीळ पडली होती. मोठमोठ्या ऑफिसेसना टाळे पडले होते. जेथून आर्डर्स सुटायच्या त्या ऑफिसमध्ये आर्डर लिहायला आणि ती पोचवायला कोणी नव्हते. दरबारची स्थिती केविलवाणी झाली होती.

संपवाले व नागरीक या दोन्हीसाठी म्हणून मी मध्यस्थाची भूमिका घेतली होती. मागण्या बऱ्याच वाटाघाटीनंतर मान्य झाल्या. मि. आस्टिन, हे पंतप्रधान होते. दरबारने मागण्या मान्य केल्या या समजुतीने, लोक कामावर गेले. माझ्या शब्दावर विश्वास ठेवून संप मागे घेण्यात आला. पण लोक कामावर गेल्यानंतर मंत्र्यानी शाब्दिक कसरत करून आमचा विश्वासघात केला.

म्हणून मी ६–२–४७ पासून उपवास जाहीर केला. यावेळी मला पाठिंबा देण्याकरता आचार्य जावडेकरांनी मुद्दाम एक खास पत्रक काढले ते :—

"कोल्हापुरात भाई माधवराव बागल यांनी दरबारच्या वचनभंगाविरुद्ध प्रायोपवेशन सुरू केले आहे. कोल्हापूर हे महाराष्ट्रातील महत्त्वाचे स्थान आहे. शिवछत्रपतींच्या स्मृतीशी कोल्हापुरचे नाव निगडित झालेले आहे. ब्राह्मणेतरांच्या सत्यशोधक चळवळीचे आश्रयस्थान कोल्हापूर होते. सातारा जिल्ह्यातील शेतकरी वर्गाच्या जागृतीत-कोल्हापूर संस्थानचा फार मोठा संबंध आहे.

कोल्हापूरच्या प्रजापरिषदेला सत्याग्रही दीक्षा देण्यात भाई माधवराव बागल यानी महत्त्वाचे कार्य केलेले आहे. खरा सत्यशोधक हा सत्याग्रही असला पाहिजे, या निष्ठेने भाई बागल यानी कोल्हापुरात एक नवजीवन निर्माण केले.... १९४२ च्या लढ्यात भाई माधवराव बागल आणि प्रजापरिषद यानी धडाडीने भाग घेतला, आणि कोल्हापुरात प्रचंड क्रांतीची लाट उठली. अशा कोल्हापुरच्या नेत्याने आज कोल्हापुरच्या अधिकाऱ्यावर म्हणजे मंत्रिमंडळावर वचनभंगाचा उघड आरोप केला असून, प्रजापरिषदेच्या या नेत्याशी समेट करण्याची बुद्धी दरबारला झाली नाही तर, कोल्हापूर संस्थानचा राज्यकारभार भंग पावून तेथील अनियंत्रित सत्तेचा पूर्ण अंत झाल्याविाचून राहणार नाही."

आचार्यांचा हा शाप खरा ठरला.

अशा रीतीने ते माझ्यामुळे कोल्हापूरच्या राजकारणाशीही निगडित झाले होते, त्यांच्या अंताने








महाराष्ट्राचा वैचारिक झरा नाहीसा झालाच पण मला सतत मिळणारा प्रेमाचा आणि ज्ञानाचा लाभ पण नाहीसा झाला ! !

## आचार्यांचे चरित्र

शंकररावजी माझ्याहून तसे मोठे नव्हते. समवयस्क म्हटले तरी चालेल. त्यांचा जन्म १८९४ त झाला. माझा १८९६ त झाला. पण ज्ञानाने त्यानी 'एव्ह-रेस्ट' शिखर गाठले होते तर मी अद्याप पायथ्या-शीच उभा आहे !

ते नुसते 'ईंझिचेअर पोलिटीशियन' अगर वाचि-वीर नव्हते.

असहकार युगात त्यानी मुंबई विद्यापीठाला रामराम ठोकला, व राजकारणात उडी घेतली. एम् ए. चा अभ्यास करून परीक्षेच्या तयारीत असताना व फीही भरली असताना ते सर्व सोडून त्यानी राष्ट्राच्या हाकेस ओ दिली.

कॉलेज सोडल्यानंतर इस्लामपूर जवळच्या पेठ या गावी 'महात्मा' नावाचे अस्पृश्यांकरता छात्रालय काढले. फुले आणि गांधी या दोघांचाही त्या नावात समावेश व्हावा.

ते स्वतः सत्तेच्या राजकारणात केव्हाही पडले नाहीत. पण पुढाऱ्यांना तत्त्वज्ञानाचा पुरवठा केला.

बी ए. ला तत्त्वज्ञान व एम्. ए ला राजकारण व अर्थशास्त्र हे विषय घेतले होते. शंकरराव देवांना त्यांच्या विचाराचा व सल्लामसलतीचा नेहमी फायदा व्हावयाचा. मार्क्सचा त्यांनी स्वतंत्र बुद्धीने विचार करून तो निव्वळ जडवादी नाही हे त्यानी सिद्ध केले.

१९३० च्या सत्याग्रहात तुरुंगात असताना त्यांची मुलगी वारली.

१९३२ ला पुनः तुरुंगवास पतकरला. त्यावेळी नाशीकच्या तुरुंगात असताना त्याना पुष्कळ वाचन मनन चिंतन करता आले व आपल्या विचाराला निश्चित स्वरूप देता आले.

त्यांची ग्रंथनिष्पत्ती पुष्कळच आहे. पण निव्वळ करमणुकीसाठी त्यानी काही लिहिले नाही. तो त्यांचा पिंडच नव्हता. काव्याची आवड होती, वाचन होते, पण काव्य लिहिलेले नाही लघुकथा कादंबऱ्या या प्रांतात ते कधीच शिरले नाहीत.

'आधुनिक-भारत' हा त्यांचा ग्रंथराज.

आचार्य भागवत ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत म्हणतात :

"या ग्रंथात आजपर्यंत स्वातंत्र्यासाठी प्रयत्न करीत असलेल्या सर्व पक्षातील वेचक सद्गुण, समाविष्ट करण्यात आले आहेत. सशस्त्र क्रांतिकारकांचा त्याग व शौर्य, प्रागतिकांची विधायकवृत्ती, समाजसुधारकानी प्रतिपादलेल्या समता, स्त्री-स्वातंत्र्य इत्यादी गोष्टी, आणि धर्मसुधारकांनी प्रतिपादलेली सत्य अहिंसा सुचिता इत्यादी तत्त्वे, या सर्व विषयांचा सुंदर समन्वय साधलेला आहे."

त्यांच्या शांतियुगाची कल्पना खालील चार वाक्यांनी सुद्धा करता येईल—

> 'सत्याग्रही कर्मयोग अहिंसक असल्याने यात शोकाला व पश्चात्तापाला स्थान नाही. हा कर्मयोग जनतेने आत्मसात केला आणि जुलुमाशी संघटित असहकार करून न्यायासाठी स्वेच्छेने आत्मक्लेश सहन करण्याचे तपोबल जागृत केले तर साम्राज्यवादी युद्धे चालूच राहणार नाहीत.'

ग्रंथनिष्पत्तीच करून ते राहिले नाहीत. वर्तमान-पत्राचे साधनही त्यानी हाताळले. व आपल्या मताचा प्रचार केला. टिळक-आगरकरांच्या नंतर ध्येयनिष्ठे-साठी लिखाण करणारे जावडेकर हेच ठरतील. त्यानी धंदा म्हणून तो हाती घेतला नाही.

१९३४ ला मुंबईच्या 'नवशक्ती' दैनिकाचे संपा-दक झाले. त्यानंतर पुण्याचे कॉंग्रेसचे 'लोकशक्ती' दैनिक चालवले. हे सुटल्यानंतर माझ्या 'अखंड-भारत' साप्ताहिकात नियमाने लिहू लागले. व नंतर संपादक-त्वही स्वीकारले.

पुढे काही कालाने शंकरराव देव यांच्या प्रयत्नाने निघालेल्या 'नवभारत' या भारदस्त मासिकाचे जावडे-कर व आचार्य भागवत या जोडीने संपादकत्व स्वीकारले. साधना साप्ताहिकाला लेख पुरवता पुरवता त्याचेही संपादकत्व त्यांच्या गळयात पडले.

सेवादलालाही आचार्यांनी चालना दिली.

सत्याग्रही म्हणून, ग्रंथकार म्हणून, तत्त्वचिंतक म्हणून व तुरुंगवासही भोगलेल्या या थोर व्यक्तीचे आर्थिक जीवन सुखाचे नव्हते. त्याना तो त्रास होऊ








लागला. पण ते तो मुकाट्याने सहन करीत आपले कार्य करीत राहिले.

प्रभाकरपंत कोरगावकर यांना याची कल्पना येताच त्यानी आपल्या ट्रस्ट तर्फे मानधन सुरू केले. पण त्यातील आवश्यक तेवढीच रक्कम स्वीकारून बाकीची ट्रस्टला परत केली. गरजेपेक्षा धनसंग्रह करायचा नाही हे तत्त्व प्रत्यक्षात आणले.

अशी माणसे पैशाने माणसाचे मोजमाप करणाऱ्या व्यवहारी जगात, दिसणार नाहीत.

तथापि अशा गरीब ध्येयनिष्ठ आचार्यांच्या सारख्यांचेच जीवन समाजाला उपकारक आणि आदर्श ठरलेले आहे. आणि निव्वळ आर्थिकदृष्ट्या यशस्वी ठरलेले काळाच्या ओघात नाहीसे होऊन क्षुद्र ठरले आहेत.

## आचार्यांची शिकवण

त्यांचे विचार खऱ्या जड रत्नाहून मोलाचे आहेत. आचार्य म्हणतात--

> 'बुद्धिवाद ही एक जीवननिष्ठा आहे. आणि ती जीवननिष्ठा ज्याना पाळावयाची असेल त्यांना सत्यनिष्ठेचे तपोबल ह्याची फार आवश्यकता आहे. सत्याचे संशोधन, सत्याचा प्रचार आणि सत्याची संस्थापना यासाठी क्लेश सहन करावे लागतात. आपली बुद्धी व भावना या दोहोंनाही शुद्ध ठेवण्यासाठी आत्मनिष्ठेला म्हणजेच सत्यनिष्ठेला जीवनात आद्य स्थान मिळाले पाहिजे.'

आचार्यांनी पण आपल्या जीवनात या सत्यनिष्ठेला स्थान देऊन आपले जीवन सफल केले. आचार विचारात सुसंगती राखली. त्यागाच्या वेळी मागे राहिले नाहीत.

खऱ्या वीराप्रमाणे मरणाचे शांतपणे व निर्विकारपणे स्वागत केले !







अनुक्रमणिका

# आम्ही
# अंतरीची ज्योत
# सतत प्रज्वलित ठेऊं!



मध्य
व
पश्चिम
रेल्वे द्वारा
प्रसारित

भरभराटीचा काळ असो अगर संकट काळ असो भारतीय रेल्वे निस्वार्थ सेवेची ज्योत सतत प्रज्वलित ठेवील. प्रवासी, माल, त्याचप्रमाणें देशाची भरभराट व स्वातंत्र्य या साठीं आवश्यक असणाऱ्या गरजेच्या वस्तू यांची वाहतूक अविरतपणें करून राष्ट्राचा जीवन प्रवाह अखंडित राखील.



यंदाचे दिपावली निमित्तानें आम्ही आमच्या आश्रयदात्यांचे सहकार्यानें भविष्य काळांत आमच्या समोर असलेले भव्य उद्दिष्ट सर्वकषपणें साध्य करूं अशी प्रतिज्ञा पुनश्च करीत आहोंत.

MARATHI



अनुक्रमणिका

श्री. एस. जे. सबनीस

# भुकेचा भूगोल आणि इतिहास

[ शेतकी विषयक रसायनशास्त्राचा अभ्यास, महाराष्ट्र, ब्रह्मदेश, उत्तरप्रदेश, बिहार वगैरे भागात साखर-कारखान्यातील नोकरीत आलेला अनुभव, डच अमलाखालील जाव्हा बेटात केलेली सफर व तेथे डच शास्त्रज्ञांनी चालविलेल्या संशोधनाचा अभ्यास, व लेखकाने स्वतः गेली १० वर्षे स्वतःच्या खेड्यात घेतलेला प्रत्यक्ष शेतकी व्यवसायाचा अनुभव अशा लेखकाच्या विविध प्रकारच्या अनुभवांच्या सामुग्रीवर हा लेख आधारित आहे. ]

## इतर व्यवसायांपेक्षा शेती मागासलेली– का?

मराठा वृत्तपत्राच्या एका रविवारच्या अंकात एका ब्राझीलीयन लेखकाच्या "भुकेचा भूगोल" या पुस्तकावर एक विस्तृत परीक्षणवजा लेख प्रसिद्ध झाला होता. त्या लेखावरून लेखक, हल्ली फॅशन बनलेल्या, 'समाजवादी' विचारसरणीने भारलेला असल्याचे दिसून येते. शास्त्रीय कारणांचा आणि ऐतिहासिक परिस्थितीचा या भुकेच्या समस्येवर कसा प्रभाव पडतो व परिणाम घडू शकतो याबाबतचे विवेचन त्या लेखात आढळले नाही.

भारतात आणि त्याबरोबरच जगाच्या मोठ्या भागात भुकेच्या समस्येने उग्ररूप धारण केले आहे; आणि हा उग्रपणा शास्त्रीय दृष्टीने या समस्येकडे पाहण्याची टाळाटाळ, व ज्या ऐतिहासिक कारणामुळे, ही समस्या भेसूर झाली आहे, ती कारणे दूर करण्याकडे दुर्लक्ष या दोन अक्षम्य चुकातून उद्भवला आहे.

शेतीव्यवसायाकडे, ज्याला दुसरा कोणताही व्यवसाय-करता येत नाही, अशा माणसांचा "जीवनाधार" या दृष्टीने आजपर्यंत पाहण्यात येत होते. बुद्धिवान् व कर्तृत्ववान् माणसांनी राजकारण, यांत्रिक उद्योगधंदे, व्यापार अशा इतर क्षेत्रात प्रवेश केला.

भारतात याचा परिणाम असा झाला आहे की, इतर सर्व व्यवसायक्षेत्रापेक्षा शेतीव्यवसायाचे क्षेत्र अगदीच मागसलेले राहिले आहे. तुलनात्मक दृष्ट्या कापडापेक्षा, औषधापेक्षा व इतर वस्तूंपेक्षा अन्नधान्याची महागाई फारच वाढली आहे.

## शास्त्रशुद्ध ज्ञानाचा अभाव

कृषिव्यवसायाच्या शास्त्रीय बाजूचे पूर्ण आकलन आमच्या पुढाऱ्यांना, समाजधुरीणांना व इतर विद्वानांना अद्याप झालेले नाही.

कृषिशास्त्राची मूलभूत तत्त्वे, खनिज सृष्टी, उद्भिज-सृष्टी व जीवसृष्टी यांचे परस्परावलंबित्व व परस्परपूरकत्व या दोन गुणधर्मांवर आधारलेली आहेत.

या तीन्ही सृष्टीच्या या दोन मूलभूत गुणधर्माचे शास्त्रीय दृष्ट्या ज्या समाजात पूर्णज्ञान व आकलन झाले आहे ते समाज आज समृद्ध आहेत व ज्या समाजात व राष्ट्रात दुर्लक्ष झाले ती राष्ट्रे व ते समाज आज दुर्भिक्षाच्या गर्तेत सापडले आहेत.

कृषिव्यवसायाच्या या मूलभूत शास्त्रीय बाजूचे महत्त्व खाली दिलेल्या एका ऐतिहासिक घटनेवरून सहज समजून येईल.

## खतांच्या किमया

अमेरिका म्हणजेच युनायटेड् स्टेट्स् या महान राष्ट्राचा पाया घालण्याचे श्रेय ज्या लोकांना देण्यात येते ते लोक "मे फ्लावर" या जहाजातून, अमेरिकेच्या अटलांटिक किनाऱ्यावर ज्या ठिकाणी प्रथम उतरले, ती जागा कोकणातील वरकस जमिनीसारखी, पावसाने धुपून गेलेली नापीक अशी होती. ही जमीन त्यानी नांगरून मका पेरणीसाठी तयार केली आणि ते पेरणीच्या तयारीत असताना, तेथे अवचित् एक रेड इंडियन अवतरला. हा रेड इंडियन 'गुलाम' म्हणून इंग्लंड व युरोपची सफर करून आला होता व त्याला इंग्रजी भाषाही अवगत होती. त्याने या लोकांना समजावून सांगितले की, मासळीचे खत दिल्याशिवाय या जमिनीत मका वाढणार नाही. खतासाठी मासळी केव्हा सापडते, ती कशी पकडावी व कशी वापरावी हेही त्याने समजावून सांगितले. त्याच्या सल्ल्याप्रमाणे त्या होतकरू लोकांनी मासळी पकडली व त्या खतावर मक्याचे भरघोस पीक काढले. याप्रमाणे त्यांची पहिल्याच मोसमात होऊ घातलेली उपासमार थांबली व एका महान् राष्ट्राचा पाया घालणे त्याना शक्य झाले.

जपानी शेतकऱ्यांनी, हेच तंत्र अगदी पूर्णावस्थेस नेले आहे. शेणखत व सोनखत या दोन महत्त्वपूर्ण खतांचा एक कणसुद्धा जपानी शेतकरी फुकट जाऊ देत नाही. इतरही खते जपानी शेतकरी वापरतात पण सोनखत, ह्याचा साठा व वापर हा त्यांच्या यशाचा

गाभा आहे. भाताचे भरघोस पीक येण्यासाठी (एकरामागे ४००० किलो) ज्या विशिष्ट खनिजांची ज्या विशिष्ट प्रमाणात जरूरी असते, ती सर्व खनिजे, सोनखतात व शेणखतात असतात. खडकापासून व जमिनीपासून स्वपोषणासाठी, वनस्पतींच्या मुळांनी अलग काढलेली ती खनिजे, पुन्हा खताच्या रूपाने जमिनीस मिळाल्यास भाताच्या पिकाची भरघोस वाढ होते. शेती व्यवसायाचे हे निसर्गसिद्ध तंत्र जपानमध्ये सर्वत्र वापरले जाते. आणि हे तंत्र न वापरता, "फक्त ओळीत रोपे लावणे एवढेच तंत्र वापरण्यात येत असल्यामुळे भारतात जपानी पद्धत त्या प्रमाणात फलदायी होत नाही.

तीन वर्षापूर्वीचे एक वर्तमानपत्री कात्रण लेखकाने जपून ठेवले आहे. त्यात खाली दिलेली माहिती आहे. "श्री. क्रुश्चेव्ह यांनी शेतकऱ्यांच्या एका मेळाव्यात रशियातील शेतकी शास्त्रज्ञांची व तंत्रज्ञांची कानउघाडणी केली होती. कारण काळ्या मातीचे क्षेत्र सोडून इतर सर्व क्षेत्रात रशियन शास्त्रज्ञांना व तंत्रज्ञांना अपयशच आले होते.

## काळी माती : एक वरदान

"काळी माती" हे सृष्टीचे एक वरदान आहे. उद्भिज सृष्टीला पोषक अशा काही महत्त्वाच्या खनिजांचा विपुल साठा या काळ्या मातीत उपलब्ध आहे. परंतु पावसाचे प्रमाण जसे वाढत जाईल तसा हा साठा कमी कमी होत जातो. कालव्याचे पाणी आणि काळी माती यांची जोडी मिळाल्यास समृद्ध शेतीचा विस्तार अल्पसायासाने होतो. इतर ठिकाणी समृद्धीचे प्रमाण पर्जन्यवृष्टीच्या वाढीप्रमाणे कमी होत जाते. म्हणूनच कोकणात "सदा पीक व सदा भीक" अशी म्हण पडली आहे. महाराष्ट्रात काळ्या मातीच्या क्षेत्रातच **समृद्ध शेती** आढळून येते. काळ्या मातीचीही समृद्धता जेथे पर्जन्याचे मान कमी असते तेथेच टिकून राहते.

## कोणत्या प्रदेशावर लक्ष केंद्रित करावयास हवे !

काळी माती आणि कालव्याचे पाणी, ही दोन्ही जेथे उपलब्ध नाहीत परंतु पर्जन्याची विपुलता आहे, त्याच क्षेत्रात समृद्ध शेती तयार करणे हाच भुकेच्या भस्मासुराला हद्दपार करण्याचा मुख्य उपाय आहे. आणि नेमके याच गोष्टीकडे सरकारचे आणि शास्त्रज्ञांचे दुर्लक्ष्य होत आहे.

## महाराष्ट्रातील यशापयश : कारणे

महाराष्ट्रात काही शेतकऱ्यांनी एकरी ३००० ते ४००० किलो भात पिकवून बक्षिसे मिळविली आहेत. सर्वसाधारण शेतकरी मात्र एकरी ८००-१००० किलो यापेक्षा जास्त उत्पादन करू शकत नाही.

हे एकरी ४००० किलो. धान्याचे उत्पादन सर्वसाधारण शेतकऱ्याच्या आटोक्यात कसे आणून देता येईल, यासाठी केंद्र आणि राज्य सरकारांनी, व शेतकी खात्यातील नोकरवर्ग व संशोधक यांनी जेवढे प्रयत्न करावयास पाहिजेत तेवढे केले नाहीत. हल्ली "सघन शेती"च्या नावाखाली जे खत आणि द्रव्यसाहाय्य पुरवठ्याचे काम सुरू आहे ती खते अपुरी आणि पुष्कळ ठिकाणी निरुपयोगी ठरत आहेत, कारण सोनखतापेक्षा तुलनेने ती अपूर्ण- पिकांची, खनिजांची गरज पूर्णपणे भागविण्यास असमर्थ अशी आहेत व तीही शास्त्रशुद्ध पद्धतीने वापरली जात नाहीत.

भारत हा मुख्यतः पावसावर अवलंबून असणारा देश आहे. भारतातील ३६-३७ कोटी एकर कृषिक्षेत्रापैकी ४०% टक्के भाग भरपूर पर्जन्यवृष्टीच्या क्षेत्रात येतो. आणि या क्षेत्रात एकरी ४००० किलो धान्य उत्पादन शक्यतेच्या कोटीत आणण्यासाठी, जेवढ्या नेटाने व जिद्दीने प्रयत्न व्हावयास पाहिजेत ते केले जात नाहीत. जे काही बंडींग (ताली बांधणे) सारखे किंवा खत वाटपाचे काम सुरू आहे तेही शास्त्रीय दृष्टीच्या अभावामुळे फुकट जात आहे. हे स्पष्ट करण्यासाठी खुद्द आमच्याच गावच्या गेल्या १८ वर्षातील परिस्थितीचे निरीक्षण उपयुक्त होईल.

## आमच्या गावाची गोष्ट !

### प्रात्यक्षिके, अनुदाने इ.

आमचा गाव काळ्या व तांबड्या मातीच्या सीमारेषेवर आहे. या भागात ८०-१२० इंच इतका पाऊस पडतो. शेती सुधारणेचे प्रयोग करण्यासाठी, आमच्या गांवाची निवड झाली. कारण बाजारपेठेचे गांव असल्यामुळे, आजूबाजूच्या २० गांवाना हे गांव मध्यवर्ती ठिकाण आहे. तालुका शेतकी संघाचे ऑफिस व गोदाम येथे आहे व वि. का. स. पतपेढीहि आहे.








शिवाय भूविकास बँकेची एक शाखाही येथे आहे. सुमारे वीस वर्षापूर्वी कंपोस्ट खत करण्यासाठी शेतकी खात्यामार्फत, खड्डे खणण्यासाठी व ते पालापाचोळ्याने भरण्यासाठी आर्थिक मदत देण्यात येत असे; व प्रात्यक्षिकेही दाखविण्यात येत असत. ही प्रात्यक्षिके गांधीजयंतीच्या मुहूर्तावर सुरू होत असत परंतु नोव्हेंबर महिन्यापासून कोरडी हिवाळी हवा पडत असल्यामुळे, व शेतकऱ्यांची कापणी मळणीची कामे सुरू होत असल्यामुळे या खड्ड्यावर जलसिंचन कोणीच करीत नसत व कंपोस्ट खत, ओलाव्याच्या अभावी कुजून तयार कधीच होत नसे. हल्ली ही प्रात्यक्षिके बंद आहेत, अनुदाने थांबली आहेत; कंपोस्ट कोणीच करीत नाही आणि जे पैशाचे वाटप झाले त्यात अफरातफर झालेमुळे दोन शेतकी कामगारांना शिक्षा झाली. इंदूरच्या हवामानात जो प्रयोग यशस्वी झाला, व ज्याचा जगभर गाजावाजा झाला, तो प्रयोग आमच्या गावी निरुपयोगी ठरला. हवामानाच्या अनुरोधाने त्यात सुधारणा झाली नाही.

## त्यानंतर जपानी पद्धती

यानंतर जपानी पद्धतीचे प्रयोग व प्रात्यक्षिके सुरू झाली. ओळीत रोपे लावणे, व सल्फेट, फॉस्फेटखताचा जादा डोज देणे व कोळपणी जपानी कोळप्याने करणे ही कामे सुरू झाली. जपानी पद्धतीचा गाभा, जो सोनखताचा वापर त्याकडे संपूर्ण दुर्लक्ष झाल्यामुळे उत्पादनात वाढ बेताचीच झाली. आज जपानी पद्धतीची रोपलावणी फक्त पाच सात एकरातच दिसून येते. व तीही खताच्या किमतीत मिळणाऱ्या बिनशर्त सुटीच्या आकर्षणामुळे. रोपे लावण्याच्या वेळी जोरदार पर्जन्यवृष्टी होत असल्यामुळे, जपानी पद्धतीचे आकर्षणच कमी झाले आहे.

## ताली घातल्या त्यांचा ( दुष् ) परिणाम

गेल्या सात वर्षापासून ताली घालून शेतजमिनी समपातळीत आणण्याचे काम सुरू आहे. दरसाल ८०-१०० इंच पाऊस पडणाऱ्या डोंगराळ भागात, जमिनीचा वरचा ९"-१२" जाडीचा थरच वनस्पती धारणास योग्य असतो; तो थर खरवडला जाऊन बांध उभे राहिले व जो खालचा भाग उघडा पडला तो वनस्पती धारणास व पोषणास योग्य नसल्यामुळे सध्या पडीत आहे. त्यावर जनावरांना चरण्यासाठी गवतही उगवत नाही. त्यामुळे चाऱ्यांचे दुर्भिक्ष व नाचणा, सावा-वरी यासारख्या भरड धान्यांचेही दुर्भिक्ष सारखे वाढीस लागत आहे. आमच्या गावात पिकणारे "नाचणा" हे धान्य, अमेरिकन गव्हापेक्षाही, गावातल्या गावात महागाईने विकले जात आहे.

या ताली घातलेल्या जमिनीचा सुपीकपणा कसा वाढविता येईल, व तो का वाढविला जात नाही याकडे या भागातील नामदार, आमदार व खासदार; तसेच जिल्हा परिषदेचे महाभाग यापैकी एकाचेही लक्ष गेले नाही. कारण या महाभागांना पुढारीपणाचा उपभोग घेणे व भविष्यकाळात पुढारीपण टिकविणे या दोन महत्त्वाच्या गोष्टींपुढे इतर क्षुल्लक गोष्टींकडे लक्ष देण्यास सवडच होत नाही.

## खते घातली पण उत्पादन-वाढ नाही

गेल्या पंधरा वर्षात रासायनिक खतांचा वापर मात्र बराच वाढला आहे. सल्फेट, फास्फेट, युरिया, नायट्रेट वगैरे खतांच्या गाड्या भरून गावच्या गोदामात येतात व शेकडो शेतकरी पोती भरून ही खते घेऊन जातात. परंतु दर एकरी धान्याचे उत्पादन वाढण्याचे काहीच चिन्ह दिसत नाही.

१९५० साली धान्याचे जे दर होते त्यापेक्षा आताचे दर ८०-९० टक्के वाढलेले आहेत. मग या कंट्रोलच्या स्वस्त किमतीने दिल्या जाणाऱ्या खतापासून, पिकात वाढ तरी होत नसली पाहिजे किंवा या रासायनिक खतांचा दुरुपयोग तरी होत असला पाहिजे. यातील काही खतांचा उपयोग हातभट्टीचे "रसायन" तयार करण्यासाठीही होत असतो.

## भावाभावांच्या वाटण्या नि जमिनींचे तुकडे

कूळकायद्यामुळे, जमिनी कसणाऱ्या कुळाच्या मालकीच्या झाल्या परंतु भावाभावामध्ये झालेल्या वाटणीमुळे जमिनीचे तुकडे इतके छोटे पडले आहेत की, त्यांची मशागत करणे फारच अडचणीचे झाले आहे. शिवाय इतक्या छोट्या जमिनीच्या तुकड्यापासून मिळणारे उत्पन्न निर्वाहास पुरत नसल्यामुळे, हा छोट्या तुकड्यांचा मालक, धड ना शेतकरी धड ना मजूर या अवस्थेत घुटमळतो आहे. आणि त्याच्या असाहाय्यतेची व अज्ञानाची झळ एकंदर क्षेत्राच्या २५ टक्के








जमिनीला आजच बाधक होत आहे. व हे प्रमाण सारखे वाढतच जात आहे.

## संशोधनाविषयीची एक गोष्ट

देशामध्ये ठिकठिकाणी प्रयोगशाळा आणि प्रयोग क्षेत्रे आहेत, व यांतून संशोधन कार्य सतत चालू आहे व बराच पैसाही खर्च होत आहे. परंतु हे संशोधन अपुऱ्या ज्ञानावर आणि केवळ डिग्री मिळविण्यासाठी होत असल्यामुळे केवळ वाया जात आहे. या बाबतीत प्रत्यक्ष घडलेले एक मजेदार उदाहरण खाली देत आहे :

कारवार जिल्ह्यातील शिरसी तालुक्यात वेलदोड्याची लागवड विस्तृत प्रमाणावर होत असते. पानावर एक प्रकारचा रोग पडल्यामुळे या पिकाचे बरेच नुकसान होत असे, एका शेतकी रसायनशास्त्राच्या प्राध्यापकाने, ही समस्या संशोधनासाठी निवडली, आणि बरीच खटपट करून निष्कर्ष काढला की, त्या जमिनीत प्रोटोझुवा नावाच्या जंतूंची वाढ झालेली आहे व हे जंतू– बॅक्टिरिया, या नावाच्या अतिसूक्ष्म जंतूंना खाऊन टाकतात. त्यामुळे पिकाला नायट्रोजन मिळत नाही व त्यामुळे रोपे वाढत नाहीत. या गोष्टीचा पडताळा पाहण्याची सुद्धा त्यांना जरूरी वाटली नाही. या संशोधनाबद्दल त्यांना M. Sc. मुंबई, D. Sc लंडन व Ph. D. ॲमस्टरडॅम एवढ्या पदव्या मिळविता आल्या. प्रोटोझुवा जंतू मारण्यासाठी जमीन भाजून काढण्याचा उपाय सुचविण्यात आला. परंतु पिकात काहीच सुधारणा झाली नाही. व काही वर्षानंतर हे सर्व संशोधन निरर्थक ठरले; व व्हायरस ( Virus ) जातीचा रोग पानावर पडल्यामुळे हा रोग होतो असे सिद्ध झाले.

## अन्नसमस्येचे मूलभूत कारण

या व इतर अशाच प्रकारच्या संशोधनावर पैसा व शक्ती खर्च होत असताना, जपानी शेतकऱ्याने सोनखत वापरण्याच्या तंत्रात जी सुधारणा केली व भाताचे उत्पादन एकरी ४००० किलोपर्यंत काढण्यात यश मिळविले, त्या बाबतीत, किंवा जास्त पाऊस पडणाऱ्या प्रदेशात पिकांना हमखास मानवणारे पर्यायी खत तयार करण्याकडे मात्र दुर्लक्ष्य झाले.

वरील विवेचनावरून जर कोणती गोष्ट स्पष्ट होत असेल तर ती ही की, शेतकी व्यवसायाच्या मनुष्याच्या जीवनातील महत्त्वाच्या स्थानाकडे भारतात इतिहास-कालापासून द्यावे तेवढे लक्ष दिले गेले नाही. शेतकी व्यवसाय म्हणजे "ज्याला दुसरे काहीच करता येत नाही अशा मनुष्याने जगण्यासाठी करावयाची धडपड" आणि त्या धडपडीत त्याला थोडीफार मदत म्हणून काही रासायनिक खतांचे व कागदी चलनी नोटांचे वाटप करणे एवढेच आधुनिक समाजवादी शासन-संस्थेचे कर्तव्य मानले जात आहे आणि हेच आजच्या भेसूर अन्नसमस्येचे मूलभूत कारण आहे.

## शेती, सत्तार्थी नेते व अशिक्षित शेतकरी

शेतकीव्यवसाय, म्हणजे चराचर सृष्टीवर प्रभुत्व-मिळविण्यासाठी, मानवाच्या अनादिकालापासून चाल-लेल्या धडपडीचा एक अत्यंत महत्त्वाचा भाग आहे व मानवाने आतापर्यंत पैदा केलेले, खनिज, उद्भिज व जीवसृष्टीचे त्याचप्रमाणे मानव निर्मित यंत्रशक्तीचे ज्ञान या सृष्टीवर प्रभुत्व मिळविण्यासाठी उपयोगात आण-ण्याची अत्यंत जरूर आहे या गोष्टीची तीव्र जाणीव अशिक्षित शेतकऱ्यांच्या, त्यांच्या मतावर निवडून येणाऱ्या पुढाऱ्यांच्या, त्याचप्रमाणे सत्तेसाठी धडपड-णाऱ्या नेत्यांच्या काळजात अद्याप निर्माण झाली नाही. आणि या जाणीवेच्या अभावामुळेच इतर सर्व प्रयत्न तोकडे पडत आहेत.

## शेती आणि त्रयस्थ बुद्धिजीवी

प्राचीन ऋषिमुनींनी, ब्रह्ममाया आणि द्वैताद्वैत यासारख्या अगोचर समस्यांवर बुद्धी खर्च केली. बुद्ध भिक्षूंनी रोग, जरा, व मृत्यू यांची एवढी धास्ती घेतली की त्यातून आत्म्याला मुक्त करण्यासाठी "निर्वाण प्राप्तीकडेच" त्यांनी बुद्धीसर्वस्व वेचले. त्यांचीच री ओढत हिंदुपंडितांनी, कर्मकांड व मोक्ष यावरच भर दिला. आणि या सर्वांचा वारसा चालविणारा आजचा बुद्धिजीवी समाज, या समस्येकडे केवळ त्रयस्थपणाने पहात आला आहे. कोणत्याही गोष्टीकडे आक्रमक प्रवृत्तीने पाहण्याची कुवतच, आजच्या बुद्धीजीवी वर्गात नाही.

ज्या समाजांनी व राष्ट्रांनी प्राचीन धर्मांधतेपासून उत्पन्न झालेल्या मानसिक दौर्बल्यातून स्वतःची मुक्तता करून घेतली, व शास्त्रीय ज्ञानाच्या जोरावर चराचर सृष्टीवर प्रभुत्व मिळविण्यासाठी दीर्घोद्योग सुरू केला ते



अनुक्रमणिका






समाज व ती राष्ट्रे आज समृद्धतेच्या शिखरावर आहेत व इतर देशात भुकेचा भस्मासूर समाजाला कमी अधिक प्रमाणात सतावीत आहे.

## शासनसंस्थांचे आद्य कर्तव्य

सारांश, भुकेची समस्या नुसत्या भौगोलिक कारणातूनच उत्पन्न होत नसून, ऐतिहासिक कारणपरंपरेतूनही ही समस्या उग्ररूप धारण करू शकते. व त्या ऐतिहासिक कारणांचे निराकरण करणे हेच मागासलेल्या देशातील शासनसंस्थांचे आद्य कर्तव्य झाले पाहिजे.

भारताची भूमी खरोखरच सुजला व सुफला आहे. या भूमीत भुकेच्या भस्मासुराला अवतार घेण्यास वावच असू नये. एकंदर ३६–३७ कोटी एकर कृषिभूमी पैकी ४० टक्के म्हणजे जवळ जवळ १४ कोटी एकर कृषिभूमी, ५० पासून १५० इंचाइतकी नियमितपणे पर्जन्यवृष्टी होणाऱ्या क्षेत्रात येते. या जमिनीची उत्पादनक्षमता सोनखत किंवा तत्सम पर्यायी खत वापरून एकरी ४००० किलो धान्य उत्पन्न होण्यापर्यंत वाढविण्यात आली तर तेवढ्यावर ७० कोटी जनतेचे सहज पोषण होऊ शकेल. पण आज ४४ कोटी जनतेलाही देशात उत्पन्न होणारे धान्य अपुरे पडत आहे. स्वतः लेखकाने अशा तऱ्हेचे मिश्र खत तयार करून, निकृष्ट जमिनीवर त्यापासून गावातील सधन शेतकऱ्यापेक्षा दुप्पट पीक काढण्यात यश मिळविले आहे.

सध्या भारताला १ कोटी टन धान्य आयात करावे लागते. जर २ कोटी एकरावर अशा अन्नपूर्णा खतांचा पुरवठा झाला तर धान्य आयात करण्याची जरूरीच पडणार नाही. भुकेच्या वेदनांची तीव्रता वाढविणाऱ्या आणखी काही इतर गोष्टींचाही बंदोबस्त योग्य वेळीच झाला पाहिजे. धान्याचा साठा, किडीपासून व उंदरापासून पिकांचे व धान्य साठ्याचे संरक्षण, व शेतकऱ्यांच्या व व्यापाऱ्यांच्या नफेबाजीवर नियंत्रण या त्या गोष्टी होत.

आज शेतकऱ्याला, बैलासाठी तगाई, खतासाठी व शेतकामासाठी कर्ज, अशा नानाविध रूपात पैशाची मदत सरकारी व निम सरकारी संस्थांकडून मिळू शकते. व वसुलीच्या बाबतीत तगादा क्वचितच होतो व ह्या बाबतीत पुष्कळच सवलती मिळू शकतात. त्यामुळे घरातील धान्यसाठा बाहेर विक्रीसाठी आणण्याची जरूरीच त्याला भासत नाही. या परिस्थितीमुळे बाजारात तंगी होऊन, किमती एकदम भरमसाट वाढतात व बिगर शेतकी समाजाची उपासमार सुरू होते. यासाठी देशातील ⅓ बिगर शेतकी समाजासाठी, शेतात पिकणाऱ्या धान्यापैकी ⅓ भाग सक्तीने सरकारी यंत्रणे कडूनच खरेदी झाला पाहिजे. सध्या शेतकऱ्यांना एका बाजूने भरमसाट सवलती व दुसऱ्या बाजूने साठेबाजीला उत्तेजन ही परिस्थिती एकदम बदलली पाहिजे.

## प्रत्येक गावात निमसरकारी यंत्रणा उभारावी

भुकेच्या भस्मासुराला भारतातून कायमचे हद्दपार करावयाचे झाल्यास, शेतकऱ्याचे अज्ञान व त्याची नालायकी यांची झळ, शेतजमिनीला बाधक होऊ नये यासाठी प्रत्येक गांवात, एक निमसरकारी यंत्रणा उभारली गेली पाहिजे. या यंत्रणेचे काम, गावातील सर्व जमिनीची पाहणी करून त्यासाठी लागणारे पूर्ण खत तयार करणे, किडीचा व उंदराचा बंदोबस्त करणे, बियाणाचा पुरवठा करणे व शेवटी बिगर शेतकी समाजासाठी सक्तीची धान्य खरेदी इतकी कामे या यंत्रणेकडून झाली पाहिजेत. त्याचप्रमाणे एखादा शेतकरी नालायक निघाल्यास त्याचे भागीदारीत त्याची जमीन कसणे हे कामही या यंत्रणेला करावे लागेल. पावसाळी भागातील १४ कोटी एकर जमीन अशा तऱ्हेच्या यंत्रणेच्या छत्राखाली आणल्यास भारतात समृद्धीचा पूर वाहू लागेल. अशा तऱ्हेच्या यंत्रणेच्या अभावी, दामोदर व्हॅली योजना व दंडकारण्य योजना निष्फळ ठरत आहेत. ही समृद्धीची गंगा भारतात आणण्यासाठी ज्या भगीरथ प्रयत्नांची आवश्यकता आहे ते प्रयत्न सध्याच्या लोकशाही राज्ययंत्रणेतील मंत्रीमंडळे, व जिल्हापरिषदा करू शकतील काय हाच आजचा जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. सध्याच्या राज्ययंत्रणेचा मुख्य दोष हा आहे की, अगदी खेड्यापासून दिल्लीपर्यंत प्रत्येक गोष्टीकडे शास्त्रीय दृष्टिकोनातून पाहण्याची संवयच आमच्या पुढाऱ्यांना, नेत्यांना व उच्चपदस्थ अधिकाऱ्यांना नाही. नेफातला पराभव, ज्याच्यामुळे भारताची बाह्य जगात नाचक्की झाली, व पानशेतचा पूर ज्याच्यामुळे कोट्यवधी रुपये अक्षरशः पाण्यात गेले व हजारो लोक बेघर झाले, ह्या दोन्ही घटना, या आमच्या राष्ट्रीय दुर्गुणांतूनच जन्मल्या आहेत.



अनुक्रमणिका







पूर्वतयारीच्या अभावी, नेफामधील दुर्घटनेचा अपघात व नळमोरींच्या, व तिच्या दरवाज्याच्या बांधकामात मूलभूत शास्त्रीय गोष्टींकडे दुर्लक्ष्य झाल्यामुळे पानशेतचा अपघात घडून आला. खुद्द आमच्या गावीसुद्धा असे दोन अपघात झाले आहेत. आमच्या गावच्या ओढ्यावर दगडी पूल बांधण्यात आला. नाल्याच्या तळापासून काही थोड्या उंचीवर ह्यूमपाईप टाकून त्यावर फरशी घालून पूल तयार करण्यात आला. परिणाम असा झाला की, पावसाळ्यात येणाऱ्या पाण्याच्या लोंढ्याबरोबर येणारा गाळ व कचरा या पाईपच्या तोंडावर अडकून बसल्यामुळे नाल्याचा ओघ आजूबाजूच्या शेतातून वाहू लागला व शेतांचे नुकसान झाले. व नाल्याच्या तळावर भर पडून, पाणी साठविण्याची व वाहून नेण्याची ओढ्याची शक्तीत्र कमी झाली. पावसाळा संपल्याबरोबर थोड्याच दिवसात नाला कोरडा पडू लागला. या नाल्याच्या दोन्ही बाजूस दोन सार्वजनिक विहिरी आहेत. त्यांची गावाला पाणी पुरविण्याची शक्तीही कमी झाली व या विहिरींच्या पाण्यावर आधारलेली २७००० (सत्तावीसहजार) रुपयांची पाणीपुरवठा योजना केवळ वाया गेली. आणि आज लोखंडी पाईप गंजून जात आहेत व गांवातल्या लोकांना उन्हाळ्यात पाण्यासाठी अतोनात कष्ट उपसावे लागत आहेत.

## लोकशाहीचा खेळ

स्वातंत्र्यप्राप्तीपासून आतापर्यंत भारतात जो "लोकशाहीचा खेळ" खेळला जात आहे, अशाच प्रकारचा खेळ हिटलरपूर्व जर्मनीत १९२० पासून १९३४ पर्यंत १४ वर्षे खेळला गेला. रिश्स्टॅगमधील त्यावेळची भाषणे व प्रश्नोत्तरे आणि आमच्या लोकसभेतील भाषणे व प्रश्नोत्तरे यात पुष्कळच साम्य आहे. आज भारतात रुपयाच्या नोटेची किंमत एकशेर तांदुळापेक्षाही कमी झालेली आहे. त्यावेळी जर्मन मार्कची किंमतही अशीच कमी झाली होती. याच परिस्थितीतून हिटलरशाहीचा जन्म झाला होता. हिटलरने आपल्या '**माइन काम्फ**' या प्रसिद्ध पुस्तकात लोकशाहीतील काही मूलभूत दोषांचे जे दाखले दिले आहेत त्याच दोषांचा तीव्र आविष्कार सध्या भारतात चालू आहे. ज्वारी खरेदी फसली, तांदूळ खरेदी केवळ नाममात्र झाली, व सध्या दंगेधोपे सुरू आहेत.

ब्रिटिश अमदानीत आमच्या गावाकडून १९४४ साली ३०० पोती भात लेव्हीदाखल वसूल झाले होते. या वर्षीच्या लोकशाही पद्धतीत एकही पोते वसूल झाले नाही.

लेव्ही वसुलीत हुकूमशाही केली तर आगामी निवडणुकीत मार बसण्याची भीतीच या घटनेच्या मुळाशी आहे.

## कायम स्वरूपाच्या तज्ञ समितीची कल्पना

अनिर्बंध हुकूमशाहीला वाव न देता हा प्रश्न हाताळावयाचा झाल्यास कृषि उत्पादन आणि धान्य पुरवठा हे खाते मुख्य मंत्र्यांच्या लहरीप्रमाणे एखाद्या अनभिज्ञ मंत्र्याच्या हाती देण्यापेक्षा, एखाद्या कायम स्वरूपाच्या तज्ञसमितीकडे हे दोन्ही प्रश्न सोपविण्यात यावेत. एस. टी कार्पोरेशन व इलेक्ट्री सिटी बोर्ड, यांच्या धर्तीवर अशी कायम स्वरूपाची समिती स्थापन झाल्यास, मंत्रीमंडळातील सत्तास्पर्धेपासून हे खाते अलिप्त राहील. निवडणुका हरण्याची भीती या समितीला राहणार नाही. शेतकरी समाज व नागरी समाज यांच्या मधला समन्वय साधण्याचे काम या समितीला साधणे मंत्र्यापेक्षा सोपे जाईल. मात्र या समितीची घटना राजकीय पक्षसंघटनेच्या धर्तीवर न आधारता अर्थशास्त्रज्ञ, कृषिशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ यांचा या समितीत प्रवेश होईल अशा पद्धतीने आखली पाहिजे.

कृषि उत्पादन, धान्यवाटप, धान्यसाठा, किंमती ठरविणे या बाबतीत या समितीला पूर्ण स्वातंत्र्य असले पाहिजे व या बाबतीत, जरूर ते उपक्रम सुरू करण्याची व प्रस्तुत कायद्यात जरूर ते बदल घडवून आणण्याची मोकळीक या समितीला असली पाहिजे; व कृषि उत्पादनाची पातळी वाढविणे हेच या समितीचे मुख्य ध्येय असले पाहिजे.

## चार गुणांची आवश्यकता

शेवटी आमच्या ज्या मूलभूत दोषातून प्रस्तुत समस्या निर्माण झाली आहे, व ज्या दुर्गुणामुळे भारताची बाहेरच्या जगात नाचक्की होत आहे, व महमुद-गझनीच्या काळापासून भारताच्या इतिहासाला अनिष्ट वळण लागले आहे, ज्या दोषांचे निराकरण निदान








पुढच्या पिढीपासून तरी करण्याचे जोरदार प्रयत्न झाले पाहिजेत. ते दोष म्हणजे : (१) प्रयत्नशीलता, (२) प्रयोगशीलता, (३) परिवर्तनशीलता व (४) पराक्रमशीलता या सद्‌गुणांचा सर्वसाधारण अभाव हे होत. या गुणांच्या जोरावरच अमेरिका, जर्मनी व जपान आज समृद्धीच्या शिखरावर आहेत. रशियातल्या कम्युनिस्ट राजवटीत अजून या गुणांची व्हावी तशी वाढ झालेली नाही, व भारतात तरी या सद्‌गुणांचा भाव बराच पडला आहे.

वरील विवेचनावरून वाचकांच्या सहज लक्षात येईल की, सध्याची समस्या ही भौगोलिक परिस्थितीतून उत्पन्न झाली नसून, ती बहुतांशी आमच्या ऐतिहासिक आणि सामाजिक दोषपरंपरेतून निर्माण झाली आहे. व त्या दोषपरंपरेचे निराकरण करण्यास समर्थ असे नेतृत्व आम्हाला लाभल्याशिवाय, ही समस्या सुटणार नाही.

**प्रात्यक्षिक करून दाखविण्याची तयारी :**

**एक आवाहन**

महाराष्ट्रापुरते बोलावयाचे झाल्यास, महाराष्ट्रात २८ लक्ष एकर जमीन भातपिकाखाली आहे. १८ लक्ष एकर जमीन खरीप, जवार या पिकाखाली आहे. त्या शिवाय नाचणीसारख्या भरड धान्याखाली आणखी बरीच जमीन आहे. या खरीप पिकांच्या भागात नियमितपणे ४० इंचापासून १२० इंचापर्यंत पर्जन्यवृष्टी होते. मोठाली धरणे बांधून कालव्याचे पाणी पुरविण्याची या भागात जरूरी नाही. व सोनखतासारखे पर्यायी खत प्रत्येक गावात तयार करून या क्षेत्राला पुरविल्यास, या क्षेत्रात उत्पादनाचे प्रमाण एकरी अर्ध्या टनापासून २ टनापर्यंत वाढविणे सहज शक्य आहे.

स्वतः लेखकाच्या मालकीची २५० एकर जमीन अशिक्षित व अडाणी अशा कुळांच्या मालकीची झाली आहे. व स्वतःच्या गावात या पर्यायी खताचे प्रात्यक्षिक उभे करून दाखविण्यासाठी लेखकाला १० एकर जमीन खंडाने मिळणे, सध्या जारी असलेल्या कूळ कायद्यामुळे अशक्य झाले आहे.

या गोष्टीचे प्रात्यक्षिक ५० एकरापासून ५०० एकरापर्यंत खरीप पिकाच्या भागात कोठेही करून दाखविण्यास लेखक तयार आहे.

कोणी पुढारी वा मंत्री या गोष्टीची दखल घेईल काय ?

---

❀ मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

❀ या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

❀ मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

अनुक्रमणिका

श्री. ह. य. कुलकर्णी, एम्. कॉम.

# ज्ञानदेवांच्या कवितेतील स्त्री

गीतेतील गहन तत्त्वज्ञानाची प्रमेये सामान्य जनांना समजावून सांगण्यासाठी ज्ञानदेवांनी निरनिराळ्या कविसंकेतांचा व उपमा-दृष्टांतांचा ठिकठिकाणी आश्रय घेतला. फुले आणि फुलपांखरे, आकाश आणि नक्षत्रे, चकोर आणि चांदणे, चंद्र आणि चंद्रकांत, मेघ आणि चातक, सागर आणि लाटा, किंवा गंगा आणि हिमालय यांचेबरोबरच तत्कालीन रूढी आणि चालीरीती यांचाही वापर त्यांनी वेळोवेळी केला. परंतु या सर्वाहून अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे मुख्य विषयाच्या स्पष्टीकरणार्थ त्यानी केलेला मनुष्यस्वभावाचा उपयोग होय. स्त्री-पुरुष संबंधातील वेगवेगळी नाती आणि त्या प्रत्येक नात्यात अनुभवास येणारे भावनेचे स्थायीभाव यांचा अत्यंत समर्पक वापर त्यांनी आपल्या व्याख्यानात केला.

स्त्री-पुरुष स्वभावाचे ज्ञानदेवानी केलेले हे दिग्दर्शन त्यांच्या उपमा-दृष्टांतांत सामावलेले असल्याने ज्ञानेश्वरीतील प्रतिपाद्य विषयाच्या दृष्टीने त्याचे महत्त्व गौणच आहे. तरीही या गौण भागातून मनुष्यस्वभावाचे जे विविध पैलू त्यानी दाखविले आहेत, ज्या विविध मूर्तींचे चित्रण केले आहे ते सहज डोळयात भरण्यासारखे आहे. ज्ञानदेवांच्या कवितेत साकार झालेल्या या मूर्तींपैकी स्त्रीची मूर्ति अशीच लक्ष वेधून घेणारी आहे.

### प्रमदा

ज्ञानेश्वरीच्या पहिल्याच अध्यायात, आपल्या काव्यकन्येचे स्वरूप श्रोत्यांना सांगण्यासाठी, ज्ञानदेवांनी नाजूक व सुकुमार कन्येची मूर्ती उभी केली आहे—

कीं प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी ।
प्रगटे जैसी आगळी । अंगनाअंगी ॥ अ. १-४२

मुळातच लावण्याची खाण असलेल्या या कन्येचा यौवनात प्रवेश होताच तिचे आगळे सौंदर्य अधिकच खुलू लागते. उद्यानात वसंत ऋतूचा प्रवेश होताच तेथील वेलींचे सौंदर्य जसे अधिक खुलून दिसते तसे या प्रमदेचे सौंदर्यही तारुण्याचा मोहक आकार धारण करते. परंतु हीच कुमारिका गडंगनेर झाल्यावर जेव्हा सासरी जाऊ लागते तेव्हा माहेराविषयी मनातून उदासीन होते-

नातरी केळवली नोवरी । कां संन्यासी जियापरी ।
तैसा न मरतां जो करी । मृत्युसूचना ॥

अ. १३-५५१

कारण आधीच सासरी जाऊन पोहोचलेले तिचे मन सासरचे रम्य चित्र रंगविण्यात दंग झालेले असते. आपला पती, सासू-सासरे, दीर-नणंदा यांचेविषयी ती मनात कल्पना करीत असते.

### नववधू

सासरी जाण्यास आतुर झालेली ही प्रमदा तिचा विवाह झाल्यावर सलज्ज नववधू बनते. नवऱ्याचे नाव घेण्याचा तिला आग्रह केल्यावर मनात असूनही ती ते टाळते. मग अशावेळी तिच्या अंवतीभंवतीचे लोक निरनिराळी नांवे घेऊन 'हा तुझा नवरा काय' असे पुन्हा पुन्हा जेव्हा तिला विचारतात तेव्हा ती 'नाही नाही' असे म्हणते. परंतु नवऱ्याचे नाव येताच लज्जेनें मुरकून गप्प बसते. या न बोलण्यानेच ती पतीच्या नावास आपली मूक संमती देत असते-

जैसे न संघणेवरी । बाळा पतीसी रूप करी ।
बोलु निमालेपणे विवरी । अचर्चा ते ॥

अ. १३-४६८

### पतिव्रता

अशी ही लाजरी नववधू पतिगृही गेल्यानंतर लवकरच तेथे रुळते व आपले सर्वस्व पतीस अर्पण करून स्वर्गसुखाचा आनंद भोगते. तिने केलेले हे दान, परत न घेण्याच्या हेतूने दिलेल्या सात्त्विक दानासारखेच असते-

मग तयाचां ठायीं वित्ता । निवर्तवावी स्वसत्ता ।
परी प्रियापुढें कांता । रिगे जैसेनि ॥

अ. १७-२२५







ज्ञानी पुरुष जसा सर्व संकोच दूर सारून ईश्वरास मिळतो तशी ही पतिव्रता पतीला मिळते–

रिगतां वल्लभापुढें । नाही आंगीं जीवीं सांकडें ।
तिये कांतेचेनि पाडे । एकसरला जो ॥

अ. १३–६०६

पतीशी एकरूप झाल्यावर आपल्या मनातील कोणतीही गोष्ट ती त्याचेपासून चोरून ठेवीत नाही–

कां उखिते आंगे जीवे । आपणपे दिधले जिया भावे।
तिये कांतु मिनलिया न राहवे । हृदय जेवी ॥

अ. ११–५७७

पतीची जी आवड तीच आपलीही आवड असे समजून ती पतीच्या स्वरूपात पूर्णपणे विलीन होऊन जाते. सागराला मिळाल्यावर गंगा जशी पुढे जातच नाही तशी ती पतीवाचून अन्यत्र जात नाही–

घडता महोदधीसी । गंगा वेगे सांडिजे जैसी ।
कां कामिनी कांतापासी । स्थिर होय ॥

अ. १८–१०८१

एका पतीवाचून दुसरा कोणताही पुरुष ती मनात आणीत नाही–

तरी एकु प्रियोत्तमु । वाचोनि वाढो नेदी कामु ।
जैसा का मनोधर्मु । पतिव्रतेचा ॥ अ. १७–१७१

किंवा परपुरुषाने तिची अभिलाषा धरल्यास ती आधीन होत नाही–

आणि परपुरुषे कामिली । कुळवधू आंग न घाली ।
निद्रालस्या न मोकळी । अशन तैसे ।

अ. १८–१०२७

कारण परपुरुषास स्पर्श करण्यास तिचे हृदय सर्वस्वी नाखूष असते–

पतिव्रतेचे हृदय जैसे । पतिवांचूनि न स्पर्शे ।
मी सर्वस्व या तैसे । सुभटांसी ॥ अ. १–१११

फार काय, खुद्द पतीशी एकांतात क्रीडा करतानाही ती कधी अतिप्रसंग करीत नाही. पतीजवळ शयन केल्यावर त्याला जे आलिंगन द्यावयाचे ते देखील सत्यसृष्टीत देण्याचे धाडस तिच्याजवळ नसते. म्हणून स्वप्नातच आलिंगन देऊन ती त्याला सकाम करते—

स्वप्नीं प्रियापुढें तरुणांगी । निदेली चेवऊनि वेगी ।
आलिंगिलेनिवीण आलिंगी । सकामु करी ॥

अ. १५–८६

आपल्या मनास पापाचा विटाळ न होऊ देता आपल्या श्रेष्ठ धर्माचे आचरण करण्यासाठी ती पतीच्या गळ्याला मिठी मारते—

प्रियोत्तमाचा कंठी । प्रमदा घे आटी ।
तैसी जीवेंसी कोपटी । धरुनि ठाके ॥ अ. १३–७८५

व त्याचेशी नाना क्रीडा करून श्रेष्ठ तपाचे आचरण करते–

पै आघवाची भोगेसी । पतिव्रता क्रीडे प्रियेसी ।
कीं तयाची नामें जैसी । तपें तियां केली ॥

अ. १८–९०७

हे तपाचरण ती निष्कामपणे करीत असल्याने–

अहेतुकें चित्तें । अनुष्ठा पां ययातें ।
पतीव्रता पतीतें । जियापरी ॥ अ. ३–९२

तिला आपल्या तपश्चर्येचे फळ मिळते. जन्मोजन्मींचा ठेवा तिला गवसतो व तिची योग्यता पतीहूनही अधिक ठरते–

पहां पां अनुरागें भजे । जे प्रियोत्तमें मानिजे ।
ते पतीहीहूनि काय न वर्णिजे । पतिव्रता ॥

अ. ६–१२९

## सुगरण

अशी भाग्यशाली पतिव्रता जेवावयास वाढू लागली म्हणजे स्वैंपाकाला देखील संपावेसे वाटत नाही–

आणि सभाग्यु पाहुणा ये । सुभगाचि वाढती होये ।
तैं सरो नये रससोयें । ऐसे आथी ॥ अ. १३–६४३

परंतु उत्तम स्वैपाक करणाऱ्या या सुगरिणीला जर अहंकाराची बाधा झाली, म्हणजे आपला स्वैपाक ती विकू लागली, तर मात्र ती पतीच्या आदराला अपात्र ठरते–

जैसी रांधवणी रससोय निकी । करुनिया मोलें विकी ।
तैसा भोगासाठीं अविवेकी । धाडिती धर्मु ॥

अ. २–२५४

–म्हणून आपला स्वैंपाक तिने विकू नये, पतीसच वाढावा. तोच तिचा श्रेष्ठ धर्म आहे. ज्ञानदेव म्हणतात, अहंकाराची बाधा झालेली लक्ष्मी देखील अहंकाररहित झाल्यावरच विष्णूचे पाय धुण्यास पात्र झाली–

मग सर्वस्वें करुनि सेवा । अभिमानु सांडुनि पांडवा।
ते पाय धुवावयाचिया दैवा । पात्र जाहली ॥

अ. ९–३७६



अनुक्रमणिका








उलट पतीच्या मतानुसार आचरण करणारी स्त्री आत्मकल्याण साधते–

पतीचिया मता । अनुसरोनि पतिव्रता ।
अनायासे आत्महिता । भेटेचि ते ॥

अ. १६–४५६

म्हणून प्रत्येक स्त्रीने अहंकार सोडून पतिसेवेला वाहून घेणेच योग्य ठरते.

### माता

पतीवर प्रेम करणाऱ्या पतिव्रतेप्रमाणेच पुत्रावर प्रेम करणाऱ्या प्रेमळ मातेची वर्णनेही ज्ञानदेवांनी ठिकठिकाणी केली आहेत. त्यांनी रंगविलेली ही माता नुसतीच प्रेमळ नाही, तर बालकाला केव्हा आणि काय हवे आहे हे नेमके ओळखणारी आहे. भूक लागल्यावर 'दूध दे' असे तिच्या बालकाला सांगता येत नसले तरी ती ते चटकन ओळखणारी आहे––

जें अपत्य थानींहूनि निघे ।
तयाची भूक ते मायेसीचि लागे ।
एऱ्हवी तें शब्दें काय सांगे ।
स्तन्य दे येरी ॥ अ. ८–१३

बालकाला स्तनपान करण्यासाठी तिच्याजवळ काळवेळ नसते. बाळाला भूक लागली आहे असे दिसताच ती आपला पान्हा सोडते––

जैसे मातेच्या ठायीं । अपत्या अनवसरु नाहीं ।
स्तन्यावांचूनि पाहीं । जियापरी ॥ अ. ३–२९

व बालकाचे पोट भरताच स्वतःही तृप्त होते. अशा समाधानी मातेची आपल्या तान्हुल्यावर सतत मायेची पाखर असते. बाळ खेळत असला तर तो पडून त्याला लागू नये म्हणून ती सारखी त्याच्या मागेमागेच असते–

ल्रळेयाचिया बाळका किरीटी ।
गवसणी करुनि स्नेहाचिया दिठी ।
जैसी खेळता पाठोपाठी ।
माउली धावे ॥ अ. १०–१३४

आपल्या डोळ्यांपुढून ती त्याला क्षणभरही दूर होऊ देत नाही. तो दूर गेला तर अधिऱ्या नेत्रांनी ती त्याची वाट पहात असते–

का स्नेहाळु माये । तान्हुल्याची वास पाहे ।
तियें दिठी आहे । हळुवार जे ॥ अ. १३–२५२

व मुलगा परत आल्यावर मीठमोहऱ्या ओवाळून टाकून त्याचे प्रेमभराने मुके घेते. परंतु एकाच तरुण स्त्रीने घेतलेल्या पतीच्या चुंबनात आणि पुत्राच्या मुक्यात फरक असतो. तिने पतीला दिलेल्या आलिंगनात काम असतो तर पुत्राला दिलेल्या आलिंगनात वात्सल्य असते–

का पतिपुत्राते आलिंगी । एकचि ते तरुणांगी ।
जेथ पुत्रभावाच्या आंगी । न लगेचि कामु ॥

अ. १३-४८०

### विरहिणी

पतीवर आणि पुत्रावर असे उत्कट प्रेम करणारी ही स्त्री त्यांच्या विरहकालात मात्र केविलवाणी होते. पतिवियोगाने तर ती वेडीपिशीच होते. सारा देश तिला प्रियाविण शून्य गमू लागतो. शिष्याच्या मनात जसे सतत गुरुगृहच वसत असते, तसा विरहिणीच्या मनातही पतीचाच देश वसत असतो—

गुरुगृह जिये देशीं । तो देशचि वसे मानसीं ।
विरहिणी का जैशी । वल्लभाते ॥ अ. १३–३७४

पती दूरदेशी गेल्यामुळे साहजिकच तिचा विरहक्षोभ वाढतो आणि विरहज्वर तिला आतूनबाहेरून पोळू लागतो—

गावा गेलिया वल्लभु । पतिव्रतेचा विरहक्षोभु ।
भलतेसणी हानिलाभु । न मनी जेवी ॥ अ. १६-७९

दिवस तिला उदासवाणा वाटतो व रात्र वैऱ्यासारखी भासते. मग अशा वेळी तिने अंगात चंदनाची चोळी घातली तरी तिला बसत असलेले कामाग्नीचे चटके कमी होत नाहीत—

चंदनाची चोळी । माझे अंग अंग पोळी ।
कान्हो वनमाळी । वेगीं भेटवा कां ॥

फुलांच्या शय्येवर ती पहुडली तरी तिच्या अंगाचा दाह कमी होत नाही. शीतल चंद्रकिरणांनी किंवा विंजणवाऱ्यानेही तो कमी होणारा नसतो. पतीशी मीलन झाल्यावर, त्याचा उष्ण श्वास आपल्या निश्वासात मिसळल्यावरच तो थांबणार असतो. त्याच्या आलिंगनातच तिचा विरहज्वर उतरणार असतो.

म्हणूनच विरहानंतर होणाऱ्या या पुनर्मीलनाची स्वप्ने तिला अधूनमधून पडत असतात. पौर्णिमेच्या दिवशी सागराला उधाण यावे तसे तिच्या हृदयातही



अनुक्रमणिका







प्रेमाचे भरते येते. पति भेटणार या कल्पनेने नेहमीचीच कांचोळी तिच्या अंगाला घट्ट होऊ लागते–

स्फुरण आले बाही क्षेमालागी ।
पाही कांचोळी न समाये अंगीं गे माये ॥

आणि प्रत्यक्ष तो भेटल्यावर, त्याचे रूप डोळे भरून पाहूनही तिच्या तोंडातून शब्द फुटत नाहीत–

भेटीचेनि सुखें मनचि होय मुकें ।
तें रुप देखें परि बोलवेना ॥

कारण यावेळी तिचे शब्दच 'मुके' होतात. हृदय हृदयाला मिळते, श्वास श्वासात मिसळतात; तेथे शब्दांचे कामच उरत नाही !

## विरहिणीची मधुराभक्ति

ज्ञानदेवांची ही विरहिणी श्रीकृष्णावर भक्ति करणारी आहे. परंतु कृष्णाशी असलेले तिचे नाते प्रेममय भक्तीचे असल्याने त्याचे सावळे रूप तिच्या हृदयात खोलवर ठसले आहे.

या सावळ्या रूपाने तिला नुसते भुलविलेच नाही, तर तिचा पिच्छाच पुरविला आहे. ते तिला सोडीत तर नाहीच, उलट तिचे हृदयच आपल्या हृदयाला जोडून टाकते–

सांवळिया बुंथी सांवळिया रुपें ।
सावळिया स्वरुपें वेधियेले ।
काय करूं गे माये सांवळें न सोडी ।
इंद्रिया इंद्रिय जोडी एकतत्वें ॥

त्यामुळे स्वतः विरहिणीच सांवळी होऊन जाते. जे जे निळे दिसेल त्याचा त्याचा तिला मोह पडतो. निळा सागर, निळे आकाश हे सारे श्रीकृष्णाच्या निळ्या रूपांतूनच आकारले आहे अशी तिची समजूत होते–

निळें हें व्योम निळें हें सप्रेम ।
निळेपणें सम आकारलें ॥

त्याच्या निळ्या रूपाने सारे ब्रह्मांडच व्यापले असल्याने त्या निळ्या रूपाच्या ध्यानातच ती दंग होते–

निळिये मंडळी । नीळवर्ण सांवळी ।
तेथें वेधलीसे बाळी । ध्यानरूपा ॥

अशी 'निळियेच्या निशी' वेडीपिशी झालेली विरहिणी तिचा कृष्ण तिला अजून न भेटल्यामुळे साहजिकच व्याकुळ होते. चंदनाचे लेप अंगावर चढविले तरीही तिचे अंग विरहज्वराने पोळत असते–

कृष्णसंगे बाली विव्हळ जाली निळी ।
चंदन अंगी पोळी विरहज्वरें ॥

तिच्या वासना तिला श्रीकृष्णाकडे खेचून नेत असतात व मनही त्याच्याच मागे भटकत असते––

श्यामाचिया घरा वासना पैं नेती ।
मने मन गुंती तये रूपीं ॥

पण तरीही तिचा कान्हा तिला भेटत नाही. तिच्यापासून दूर राहून तो जणु तिचा अंतच बघत असतो. जीवाला अशी व्याकुळता लावून तो निघून गेल्यामुळे दिवस आणि रात्र तिला सारखीच त्रासदायक वाटतात—

दिनु तैसी रजनी मज जाली गे माये ।
अवस्था लावुनि गेला अझुनी कां न ये ॥

साहजिकच ती दर्शन देण्याविषयी त्याला परोपरीने विनवीत असते. पण तो लबाड तिला दर्शन देत नाहीच, उलट आपला घनु वाजवून तिचे चित्त अधिकच व्याकुळ करतो––

घनु वाजे घुणुघुणा । वारा वाजे रुणुझुणा ।
भवतारकु हा कान्हा । वेगीं भेटवा कां ॥

अशा व्याकूळ व उतावीळ अवस्थेतच ती सर्वांना त्याचा ठावठिकाणा विचारीत सुटते. झाडाच्या डहाळीवर बसून कोकणाऱ्या काऊला ती शकुन विचारते व काऊने चांगला शकुन सांगावा म्हणून त्याला वेगवेगळी आमिषे दाखविते–

उड रे उड रे काऊ तुझे सोन्याने मढीन पाऊं ।
पाहुणे पंढरीरायें घरां कै येती ॥
दुधें भरुनी वाटी लावीन तुझे वोंठीं ।
सत्य सांगे गोठी विठो येईल कायी ॥

कृष्णभेटीसाठी व्याकुळ झालेली ही विरहिणी जशी उतावीळ तशीच कोडगीही असते. एकदा तो भेटल्यावर बळजबरीने आपली चुंबने घेईल व मग आपणास पळता भुई थोडी होईल हे पुरते ठाऊक असल्याने एकीकडे ती आपल्या मनाला--

त्वचेचिया राना धाडूं नको मना ।
तेथे नंदाचा कान्हा डोळा घाली गो आई यो ।

असे बजावीत असते, तर दुसऱ्याच क्षणी ती त्याच्याच मागे धावत सुटते, मग त्याने तिचे कितीही हाल केले तरी तिला चालतात. आपले जातिकुळ हरपले तरीही तिला पर्वा नसते. कारण त्यांच्यावाचून जगणे अशक्य आहे हे तिला यावेळी कळून चुकलेले असते—






जातिकुळ गेले माझे हारपोनि ।
श्रीरंगावाचूनि आनु नेणें ॥
किती वो शिकवाल मज वेळोवेळां ।
मी तया गोवळा रातलीये ॥

या उन्मादांतच त्याच्याकडून अष्टभोग भोगण्याची तिला चाड उरत नाही–

अष्टभोग भोगणे माते नाही चाड ।
भक्तिप्रेम गोड लेइलेंगे माये ॥

उलट त्यात ती स्वतःला धन्यच समजते; आणि आपल्या स्वैर, मोकाट वर्णनाचे समर्थन दुसऱ्या गोपींना चांगले ठणकावून करते–

आजिवरी होते मी मोकाट ।
तंव डोळे फुकट तुम्ही मोडा ॥

कारण अष्टभोग भोगल्यानंतर तिच्या जीवनाचे खरे सार्थक झालेले असते. ते सावळे रूप यावेळी तिच्या हृदयात पूर्णपणे बिंबलेले असते. एका दिव्याने दुसरा दिवा लावावा तसे एका हृदयातील प्रेमज्योतीने दुसऱ्या हृदयातील प्रेमज्योत पेटविलेली असते —

सावळेचे तेज सावळे बिंबले ।
प्रेम ते घातले हृदयघटी ॥

श्रीकृष्णावरील प्रेममय भक्तीने वेडी झालेली ही विरहिणी कधी कधी शिष्या होऊन गुरूवर देखील मधुराभक्ति करू लागते. जीवरूपी शय्येवर गुरूला पति करून भोग भोगण्याची इच्छा ती करीत असते—

नातरी जीवाचिये शेजे । गुरू कांतु करूनि भुंजे ।
ऐसी प्रेमाची भोजे । बुद्धी पाहे ॥ अ. १३–३९०

## सती

परंतु पतीवर, श्रीकृष्णावर अथवा गुरूवर प्रेम करणाऱ्या या विरहिणीला मीलनाचे हे सुख नेहमीच मिळते असे नाही. पती कायमचा अंतरला तर तिचे सुख कायमचेच नष्ट होते. पतिनिधनानंतर स्वत: जगणे देखील तिला लाजिरवाणे वाटते. म्हणूनच मृत पतीची परलोकातही सोबत करण्यासाठी ती सती जावयास सिद्ध होते—

प्राणनाथाचिया अवधी । विरहिणीते जिणेही बाधी ।
तैसे सुखजात बाधी । दुःखाचा लागे ॥ अ. १८-९२०

तेवढ्यासाठी 'भाळी' कुंकवाचा मळवट भरून व नाना सौभाग्य अलंकारांनी नटून हातात सतीचे वाण घेऊन ती आत्मसमर्पण करावयास तयार होते. तिच्या अंगावरील वस्त्रालंकार व ती भोगणार असलेली कठोर शिक्षा इत्यादि सर्व लोकांना दिसत असले तरी त्याचे भान नसते–

कां महासतीचे भोग । देखे कीर सकळ जग ।
परी ते आगीं ना आंग । ना लोकु देखे ॥

अ. १८–४४०

कारण तिचे चित्त एका पतीकडेच लागलेले असते. चितेच्या ज्वाळा पाहूनही तिच्या अंगावर भीतीचे रोमांच उठत नाहीत–

जरी आवडी आथी साच । तरी जीवितही सलंच ।
आगीं घालितां रोमांच । देखिजति सतिये ॥

अ. १८–६४२

## विधवा व वांझोटी

पतीविषयी अशी उत्कट प्रीती व भक्ती असलेली ही पतिव्रता पतीमागोमाग सती गेली तर भाग्यवान ठरते पण मागे राहिली तर अभागिनी विधवा ठरते. विधवा व वांझोटी या दोघीही अभागिनीच असतात. वांझोट्या स्त्रीच्या मुलाची जन्मपत्रिका करण्याची जशी गरज नसते–

वांझेचिया लेका । कैची जन्मपत्रिका ।
नभीं निळी भूमिका । कें कल्पूं पां ॥

अ. १५–२३४

तशी विधवेलाही कुंकू लावण्याची गरज नसते–

वोसगृही तोरण बांधलें ।
कां उपवासी अन्नें लिंपिलें ।
कुंकुसेंदुर केलें । कांतहीने ॥ अ. १३–४६९

परंतु त्यांतही वांझोट्या स्त्रीपेक्षा विधवाच जास्त अभागिनी असते. कारण उतार वयातही वांझोटीला मूल होण्याची, व त्या आनंदाने ती हुरळून जाण्याची शक्यता असते–

हे असो वयसेचिये शेवटीं ।
जैसे एकचि विये वांझोटी ।
मग ते मोहाची त्रिपुटी । नाचो लागे ॥

अ. ६–१२१

परंतु विधवेच्या बाबतीत ही शक्यता नष्ट झालेली असते. तिला नुसते कुंकू लावणेच अशक्य होत नाही तर मानाने जगणे देखील अशक्य होते. उलट सर्वांच्या

अनादराला पात्र झाल्याने तिचे जीवन सर्वथैव असह्य ठरते–

जैसी भातारेंहीन वनिता । उपहति पावे सर्वथा ।
तैशी दशा जीविता । स्वधर्मेविण ॥ अ. २–१९९

**कामिनी**

प्रथमवयसाकाळी प्रमदा किंवा लावण्यगुणकुळवती पतिव्रता यांचेबरोबरच काही वाईट चालीच्या स्त्रियांची चित्रेही ज्ञानदेवांनी रंगविली आहेत. त्यात डोळ्यात काजळ घालून नटूनथटून रस्त्याने जाणाऱ्या कामिनीचे वर्णन वारंवार येते. अशी चंचल स्त्री रस्त्याने चालू लागली म्हणजे साऱ्या कामुक पुरुषांची नजर आपोआपच तिजवर पडते––

आत्मज्ञानें चोखडी । संत जे माझी रुपडीं ।
तेथ दृष्टी पडो आवडी । कामिनी जैसी ॥
अ. १८–१३५६

कारण तिच्या डोळ्यात त्यांना आवाहन असते. चंचल नेत्रकटाक्षांनी त्यांची हृदये घायाळ करण्याचे सामर्थ्य तिच्या नेत्रात असते––

काय चंचळु मासा । कामिनीकटाक्षु जैसा ।
लवलाहो तैसा । विजू नाही ॥ अ. १४–१७०

विषयासक्त पुरुषाला नजरेने आपलेसे करून गारुड्याच्या माकडासारखे नाचविण्याची अद्‌भुत जादूही तिच्या नजरेत असते. सारांश, आपल्या रूपाने-हालचाल करून सर्वांना मोहविणारी ही मायाविनी कोणताही खेळ सहज आकाराला आणू शकते–

जियेते अळुमाळु । रूपा गुणाचा चाळुढाळु ।
तैं भलतैसाहि खेळु । लेखा आणी ॥ अ. १३–९८५

**स्वैरिणी**

परंतु अशी चंचल स्त्री पतीच्या दृष्टीने फारच धोक्याची असते. म्हणूनच शहाणा नवरा अशा ओढाळ पत्नीला बाहेर फिरकू न देता घरातच डांबून ठेवतो–

बाहेरी धीट जैसी । दादुगा पति कळासी ।
करी टेहणी तैसी । प्रवृत्तीसी ॥ अ. १३–५०५

परंतु ती स्त्री पतिपेक्षाही चतुर असते. काही काळ ती पतीच्या अंतःकरणात शिरून वागते व मागील गोष्टी तो विसरला आहे असे पाहून हळूच जाराकडे जावयास निघते–

कां कांताचा मानसीं । रिगोनि स्वैरिणी जैसी ।
राहाटे जारासी । जावयालागी ॥ अ. १३–८०८

आणि आश्चर्य असे की प्रियकराचा आश्रय करूनही ही जारिणी स्वतःला कुलीन समजून मनात समाधान पावते–

वल्लभाचियें उजरिया । आपणया पति कुस्त्रिया ।
जोडोनि तोषिती जैसिया । अहेवपणे ॥
अ. १६–३७७

**गांवद्वारीची अहेव**

जाराकडे जाणारी ही स्वैरिणी जशी कुलीन तशीच गांवाच्या वेशीजवळ ठाण मांडून बसलेली वेश्याही कुलीनच असते! कारण गांवातील सर्व लोकांचेच ती कुटुंब असल्याने त्या सर्वांच्या कृपेने अखंड सौभाग्यवतीच असते! म्हणूनच अशा स्त्रीस ज्ञानदेवांनी 'गांवद्वारीची अहेव' म्हटले आहे —

ऐसा अखंड भजन करी । उगा नसे क्षणभरी ।
आघवेनि गांवद्वारीं । अहेव जैसी ॥
अ. १३–८२१

अशा स्त्रीचा स्वभावधर्म ज्ञानदेवांनी ठिकठिकाणी स्पष्ट केला आहे. खोडाळ गाय जशी आपला पान्हा चोरते तशीच ही वेश्याही आपले उतार वय झाकते.

खडाणे आला पान्हा । पळवी जेवी अर्जुना ।
कां राहे पण्यांगना । वडीलपणें ॥ अ. १३–२०४

आणि वय झाकलेले आपले शरीर पुरुषांना विकण्यासाठी कृत्रिम रीतीने शृंगारते —

अंग बोल माखुनि तवें । विकावया आपणपें ।
अंगहीन पडणें । जियापरा ॥ अ. १७–२४६

तिचा शृंगार जसा कृत्रिम तसाच तिने दाखविलला स्नेहही कृत्रिम असतो–

जें व्याघ्राचें क्षेत्र । पण्यांगनेचें मैत्र ।
जें विषयविज्ञानयंत्र । सुपूजित ॥ अ. ८–१४६

चोराने दाखविलेली मैत्री जशी दिखाऊ तशी बाजारांतील 'बाईने' दाखविलेली मैत्रीही दिखाऊच असते–

पहिलें संवचोराचें मैत्र । हाटभेटीचें कलत्र ।
कां लाघवियाचें विचित्र । विनोद ते ॥
अ. १८–७९७

बहुरुपी जसा निरनिराळी सोंगे घेऊन लोकांची करमणूक करतो तशीच ही वेश्याही नाना प्रणयचाळे करून कामांध पुरुषांना आपल्या जाळ्यात पकडते. परंतु तिच्याकडे येणाऱ्या पुरुषाजवळील पैसा संपला म्हणजे स्नेह दाखविणारी हीच वेश्या त्याला दूर लोटते. मग












असा द्रव्यहीन पुरुष तिच्या दाराला देखील स्पर्श करू शकत नाही–

जैसा वेश्याभोगीं कवडा वेंचे ।
मग दारहि चेपूं न ये तियेचें ।
तैसें लाजिरवाणें दीक्षितांचें ।
काय सांगो ॥ अ. ९. २२९

म्हणून ज्ञानदेव म्हणतात, अरण्य लागले नाही तोपर्यंतच चोराची मैत्री जशी चांगली, तशी अंगस्पर्श झाला नाही तोपर्यंतच वेश्या चांगली–

संवचोरमैत्री चांग । जंव न पविजे तें दांग ।
सामान्या भली आंग । न शिवे तंव ॥

अ. १८–२५०

कारण एकदा तिचा स्पर्श झाला की पुरुष बिटाळला जातो व त्याज्य मानले गेलेले तामस सुख भोगून नरकाचा धनी होतो–

आणि अपेयाचेनि पानें । अखाद्याचेनि भोजनें ।
स्वैरस्त्रीसंनिधानें । होय जें सुख ॥ अ. १८-८०६

## पुन्हा स्वपत्नी

म्हणून शहाण्या पुरुषाने रंभेहून सुंदर असल्या तरी परस्त्रिया हाताळू नयेत. उलट स्वतःची पत्नी कुरूप असली तरी तिलाच आपली समजून वागवून घ्यावी–

हें असो वनिता आपुली । कुरुप जरी जाहली ।
तरी भोगितां तेचि भली । जियापरी ॥

अ. ३–२२४

कारण तीच त्याची खरी सहधर्मचारिणी असते; तीच खरी पतिव्रता असते.

अशा लावण्यगुणकुळवती स्त्रीची मूर्ति ज्ञानदेवांनीं उभी केली आहे. ज्ञानदेवांच्या कवितेत साकार झालेल्या या स्त्रीचे विविध मनोधर्म पाहिले म्हणजे त्यांच्या निरीक्षणशक्तीचे नुसते कौतुकच नव्हे तर आश्चर्यही वाटू लागते. स्त्रीच्या अंतर्मनात प्रवेश करून तिच्या हृदयात उठणाऱ्या नाजुक उर्मींचे इतके सूक्ष्म निरीक्षण त्यानी केले तरी कसे असा प्रश्न पडतो. परंतु यात आश्चर्य करण्यासारखे काही नाही. उलट स्त्रीसुख कसे ते मुळीच माहीत नसलेल्या ज्ञानदेवांसारख्या थोर आत्मानुभवी योग्यांची दृष्टी अदृष्टांतही प्रवेश करू शकते व आपल्या बोलातून अरूपाचेही रूप दाखवू शकते हीच गोष्ट यावरून सिद्ध होते. ज्ञानदेवांच्या प्रतिभेचे अलौकिकत्व दाखविण्यास याहून वेगळा पुरावा तो कोणता हवा ?

---










अनुक्रमणिका

प्रा. अ. भि. शाह

# भारत, पाक व आंतरराष्ट्रीय राजनीती

भारत व पाक यांच्यात अस्थिर शस्त्रविराम झाला असून या नव्या परिस्थितीच्या प्रकाशात या दोन्ही देशांच्या आणि पाश्चात्यांच्या, विशेषतः अमेरिकेच्या नेत्यांना आपल्या धोरणांचे पुनर्मूल्यमापन करण्यास अगदी आवश्यक असलेला वेळ मिळाला आहे. वस्तुतः ही परिस्थिति अगदी नवी नाही. सन १९६२ च्या मध्यातच म्हणजे क्यूबातून रशियाला माघार घ्यावी लागली, चीनने भारतावर आक्रमण केले आणि रशिया-चीन मतभेद जाहीरपणे प्रथम पेटू लागले तेव्हाच ही नवी परिस्थिती प्रकट होऊ लागली. नंतर भारताच्या सुरक्षिततेशी संबद्ध नवे अंश त्यात अधिक प्रविष्ट झाले ते हे की, काश्मीरच्या प्रश्नावर पाकिस्तानला उतावीळ लागून तो भारताला चपराक देण्याकरिता चीनच्या जाळ्यात जाणून बुजून शिरला; अहंमन्य विद्यापीठीय विद्वानांचा चीनला संतुष्ट करण्याचा उपदेश बाजूला सारून दक्षिण व्हिएटनाममध्ये निश्चित कडक धोरण अमेरिकेने अवलंबिले; आणि कम्युनिस्टांशी सहकार्य करून इंडोनेशियाने 'राष्ट्रीय ऐक्याचा बहाणा' करून ताठरपणा दाखविण्यास प्रारंभ केला.

जागतिक सत्तासमतोलनाच्या स्वरूपात निश्चित बदल दाखविणारे हे वळण होय. आता कोणालाही आशा बाळगता येते की, अमेरिकेने गलथानपणाचा गुन्हा केला नाही तर सोविएट रशिया आपल्या साम्राज्याच्या विस्तारार्थ आपल्या सामर्थ्याचा उघडपणे उपयोग करणार नाही किंवा बिनकम्युनिस्ट जगाच्या विरुद्ध जागतिक कम्युनिस्टांच्या ऐक्याचा पुनरुद्धार करण्यासही समर्थ होणार नाही. दुसरे असे की, अमेरिका व रशिया यांच्यामध्ये महायुद्ध भडकण्याचाही धोका राहिला नाही, त्यामुळे पश्चिमी गट व कम्युनिस्ट गट यांच्यामध्ये फुटीरपणा वाढत राहणार आहे; या दोन्ही गटांमधील राष्ट्रे अमेरिका वा रशिया यांच्या खुषी नाखुषीची पर्वा न करता आपसातले संबंध सुधारण्याचा वा बदलण्याचा प्रयत्न करीत राहणार; नाटो, सेंटो व वारसा करार त्यांच्या अशा प्रयत्नांच्या आड येणार नाही; यालाच प्रा. ब्रेझिन्स्कीने 'युरोपमधील शांततामय सामना' म्हटले आहे.

या परिवर्तनाचा गर्भितार्थ भारत व पाक यांच्या दृष्टीने अगदी स्पष्ट होऊ लागला आहे. प्रथम असे की, या दोन्ही देशांची विशेषतः भारताची आतापर्यंतची विदेश राजनीती स्वतःच्या हितसंबंधांशी विसंगत बनली आहे, ही गोष्ट गेल्या तीन वर्षांच्या अवधीत अत्यंत उघड झाली आहे. गेल्या १९६२ च्या ऑक्टोबरमध्ये रशियाने 'मित्रवत् भारत' व 'बंधुसम चीन' अशा शब्दांनी भारत व चीन यांच्यातला फरक सुचविला आणि चीन भारतावर आक्रमण करणार याची कल्पना अगाऊ आली असतानासुद्धा हा फरक सुचविला. रशियाच्या वर्तनावरून चीनलाही अशी सूचना* मिळाली होती की भारतावर चीनने आक्रमण केले तरी हरकत नाही. उलट, भारताने पूर्व-पश्चिम शीतयुद्धात क्यूबापूर्वकाली रशियाकडे कलती तटस्थता स्वीकारली होती तर चीनच्या आक्रमणाच्या वेळी अमेरिका व इतर पश्चिमी राष्ट्रे यांनी भारतास कसलीही अट न घालता लष्करी मदत सुरू केली. गेल्या महिन्यातल्या भारत पाक युद्धात अमेरिका व रशिया यांच्या धोरणात बदल व्हावा अशी अपेक्षा होती, परंतु ह्यावेळी जवळजवळ सगळ्या जगाने कोण हल्लेखोर आहे व कोण नाही, याचा न्यायनिवाडाच देण्याचे नाकारले आणि दोन्ही विरोधी बाजूंनी शस्त्रसंधी करावा, सैन्ये मागे घ्यावी व शांततेने तह करावा असा सल्ला दिला.

भारताची तटस्थता लक्षणीय आहे; परंतु त्याकरिता भारताने योग्य तयारी करावयास पाहिजे होती. पश्चिमी राष्ट्रांचा काश्मीरबद्दलचा दृष्टिकोण नवा नाही; काश्मीर भारताचा भाग ही गोष्ट त्यांना

* William E Griffith– The Sinosoviet Rift London 1964 pp. 58–59








पटलेली नाही. परंतु पश्चिमी राष्ट्रांनी पाकिस्तानचा हल्लेखोर म्हणून निषेध केला नाही ही गोष्ट मात्र त्यांच्या नैतिक मूल्यमापनाशी विसंगत असल्यामुळे असमर्थनीय ठरते. परंतु ही गोष्ट अनपेक्षित नव्हती. एका अर्थी ते भारताचेच अनुकरण ठरते. बर्लिन, कोरिया, व्हिएटनाम, हंगेरी आणि तिबेट यांच्या संबंधात अशीच वृत्ती भारतानेही स्वीकारली आहे. परंतु हे खरे आहे की, पश्चिमी राष्ट्रांनी यावेळी अंगिकारलेले धोरण हे अदूरदर्शीच म्हणावे लागते ; कारण, एका बाजूला आत्मरक्षणार्थ प्रवृत्त झालेली भारतीय लोकशाही आहे व दुसऱ्या बाजूला धर्माच्या व काश्मीरसंबंधी स्वयंनिर्णयाच्या नावाने आक्रमक बनलेली लष्करी हुकूमशाही आहे, असा फरक दाखविण्याची महत्त्वाची संधी पश्चिमेने गमावली आहे. पश्चिमेचे असेच धोरण राहील अशा भविष्यवादाचे चिन्ह पुष्कळांना कच्छवरील आक्रमणाच्या वेळीच दिसून आले.

रशिया यावेळी जसा वागला त्याची पुष्कळ भारतीयांना अपेक्षा नव्हती. सन १९६२ मध्ये चीन-रशिया यांचे भांडण नुकतेच चव्हाट्यावर आले होते व क्रुश्चेव्हला पुनः समझोता घडून येण्याची अपेक्षा होती. १९६५ च्या सुमारास तज्ज्ञांना असे दिसून आले की रशिया व चीन यांच्यात पडत चाललेले अंतर भरून निघणारे नाही; नजिकच्या भविष्यकाळात तरी ते शक्य नाही. म्हणून आशियात नवे मित्र मिळविण्याची खटपट करून चीनवर मात करण्याची ईर्षा रशियात उत्पन्न झाली. क्रुश्चेव जाण्याच्या अगोदर पासूनच पाकिस्तानला आपल्या बाजूस ओढण्याची खटपट सुरू झाली. नुकत्याच घडलेल्या घटनांवरून ही गोष्ट आता शाबीत होऊ लागली आहे. १९६५ सप्टेंबर ३ तारखेस भारतानुकूल असलेल्या 'आज साफा' (बैरूट) या लेबानी वृत्तपत्रात आलेले कैरोच्या बातमीदाराचे २ तारखेचे वृत्त असे आहे– "पाकिस्तानला रशियाने असे खाजगी आश्वासन दिले आहे की, यापुढे संयुक्त राष्ट्रांच्या समितीत काश्मीरच्या प्रश्नावर आपण व्हेटो वापरणार नाही. भारत रशियावर या मुद्यासंबंधी आक्षेप घेण्याच्या स्थितीत नाही, याची रशियाला खात्री आहे. सोविएट रशियाने पाकिस्तानला आर्थिक व राजकीय साहाय्य सर्वसाधारणपणे करण्याचे आश्वासनही दिले आहे." हाच वार्ताहर पुढे असे म्हणतो की कराची येथील मुत्सद्दी वर्तुळाकडून या वृत्ताचे सत्यत्व मान्य केले गेले आहे, असे अलजीर्स येथे तपास करता कळते. तेथे असेही सांगण्यात आले की, "सोविएटने प्रत्यक्ष स्वरूपात मदत देऊ केली असून दोन्ही राष्ट्रांचे संबंध दृढ करण्याच्या उद्देशाने चर्चा करण्याचेही ठरविण्यात येत आहे". या वृत्ताच्या उपसंहारात असा निष्कर्ष काढला आहे की, "जेव्हा काश्मीरच्या प्रश्नावर भारत-पाक वाद वाढीस लागला तेव्हा या हालचाली सुरू झाल्या. याचा अर्थ असा निघतो की, चीन-सोविएट संघर्षातून जेवढा काही थोडाबहुत फायदा मिळवता येईल तितका मिळवावा, या गोष्टीस सोविएट प्रथम महत्त्व देत आहे. दोन्ही बाजूंचा तौलनिक विचार करूनच मास्को वरील निर्णयास पोचले असावे." हे वृत्त प्रकाशित झाल्यानंतरच्या घटना या वृत्ताचे समर्थनच करतात.

## (२)

यावरून असे म्हणता येते की, भारताला तटस्थतेच्या धोरणामुळे मिळालेले राजकीय फायदे अल्पच दिसतात. परंतु कित्येक वेळा असे समर्थन देण्यात येते की, तटस्थतेच्या धोरणामुळे पश्चिमी व पौर्वात्य अशा दोन्ही गटांकडून लष्करी वा आर्थिक मदत मिळविता येते. पाकिस्तानपेक्षा अधिक सामर्थ्य उभारता आले आहे. भारताने यापुढे कसा बदल करणे इष्ट आहे याची चर्चा करण्याच्या अगोदर वरील विधानाची समीक्षा करणे बोधप्रद ठरेल.

१९५४ ते १९६४ या दशकात पाकिस्तानला अमेरिकेकडून सातशे कोटी किंमतीची लष्करी मदत मिळाली. भारतालाही यापेक्षा दुप्पट मदत मिळाली असती. परंतु त्याने तटस्थतेच्या धोरणामुळे नाकारली. चीनच्या आक्रमणानंतर भारताने इतर राष्ट्रांच्या दरवाजांवर जाऊन मागण्या करण्याचा सपाटा लावला. रुपये चाळीस कोटी किंमतीची लष्करी मदत त्यानंतर अमेरिकेने दिली. काही इतर पश्चिमी राष्ट्रांनी दिली. सहा मिग विमाने रशियाने सावकाशपणे दिली, आणि मिगचा कारखाना भारतात स्थापन करण्याचा इरादा दाखविला. हा कारखाना पुरा होण्याच्या आत भारताने पाकिस्तानशी समाधानकारक समझोता करावा असा










सल्ला रशियाने पश्चिमी राष्ट्रांच्या पावलावर पाऊल ठेवून आता दिला आहे.

आर्थिक मदतीच्या बाबतीतही असाच निष्कर्ष निघतो. पश्चिमी गटाकडून भारताला माणशी जितकी मदत केली त्यापेक्षा माणशी तिप्पट मदत पाकिस्तानला केली आहे. रशियाकडून मिळालेल्या आर्थिक मदतीने या तुलनेमध्ये फारसा फरक पडत नाही. सन १९६४ पर्यंत एकोणीसशे तीस कोटी पंचावन्न लक्ष रुपये अमेरिकेकडून मिळाले आणि त्यामध्ये एकशे बावन्न कोटी त्रेसष्ट लाख रुपये मदतीची भर रशियाकडून पडली.

भारताला उपरिनिर्दिष्ट मदत त्याने घेतली नसती तरी चालले असते असे अनुमान वरील पृथक्करणा-वरून काढू नये. या पृथक्करणाचा एवढाच अर्थ आहे की, आधुनिक लोकशाही राष्ट्र म्हणून भारताला तटस्थतेमुळे काही विशेष आर्थिक वा राजकीय फायदे झाले असे म्हणता येत नाही. शांततावादी सुशिक्षित आणि सद्भावनेचे पश्चिमी समाजवादी यांनी निंदा केली नाही, एवढाच यापासून फायदा झाला. आधुनिक हुकूमशाहीचा अर्थ लक्षात न घेतल्यामुळे आग्नेय एशियातील शांति आणि स्थैर्य रक्षिण्याकरिता भौगोलिक राजकारणात भारतास मध्यवर्ती नेतृत्व प्राप्त झाले असते ते तटस्थतेमुळे गमावले. आफ्रिका आणि रशिया यामधील सर्वश्रेष्ठ लोकशाही राष्ट्र या नात्याने भारताला या भूभागातील स्वतंत्र राष्ट्रांचे कम्युनिस्ट राष्ट्रांच्या आक्रमणापासून व विध्वंसक कारवायांपासून संरक्षण करणारे राष्ट्र म्हणून ते स्थान प्राप्त झाले असते. लोकशाहीविरुद्ध हुकूमशाही असा विश्वव्यापी झगडा सुरू आहे. त्यापासून भारतास अलिप्त राहता येणे शक्य नाही. एक लोकशाही राष्ट्र म्हणून भारतास जगावयाचे असेल तर कम्युनिस्ट चीनचे आव्हान स्वीकारण्याशिवाय भारतास गत्यंतर नाही. स्वतःच्या मोक्षसाधनेकरिता जगातील संघर्षांपासून व कटकटींपासून अलिप्त राहण्याचे भारतीय धोरण हिंदुधर्माच्या परंपरेशी सुसंगत असले तरी जगातील इतर राष्ट्रे इतकी पर-लोकवादी नाहीत. आंतरराष्ट्रीय जीवनमार्गात असा परलोकवादी दृष्टिकोण एवढ्या मोठ्याराष्ट्रास पचविता येणे राष्ट्र या नात्याने शक्य नाही. राज्यकर्ता व संत एकच अशा भूमिकेवरून जवाहरलाल नेहरू यांनी जे धोरण आखले ते अत्यंत शुद्ध स्वरूपात यापुढे टिकविता येणार नाही.

खरे पाहता ही तटस्थता १९५४ सालानंतर भारताला टिकविता आली नाही. काश्मीर प्रश्नाच्या बाबतीत रशियाच्या व्हेटोवर अवलंबून राहावे लागले. आणि इजिप्तचाही आधार घ्यावा लागला. नेहरूंना बराच काळपर्यंत सोविएट व कम्युनिस्ट चीन यांच्या-कडे कलते धोरण स्वीकारावे लागले. भारताला मोठे युद्ध एकट्यालाच लढण्याची पाळी येईल असा योग्य वेळी अगाऊ विचार या तटस्थतेमुळे सुचला नाही. त्याचा परिणाम संरक्षणाच्या तयारीची उपेक्षा हाच झाला. मास्को, पेकिंग व कैरो यांना आवश्यकते-पेक्षा अधिक महत्त्व द्यावे लागले. त्या मानाने पश्चिमींची उपेक्षा अधिक झाली. काही झाले तरी स्वतंत्र राष्ट्रांचे कम्युनिझमपासून संरक्षण करणे ही पश्चिमी राष्ट्रांचीच जबाबदारी मानली गेली आणि कित्येक वेळा प्रमाणाबाहेर त्यांच्यावर टीका कर-ण्याची सवलतही आम्ही भोगली.

## ( ३ )

१९६२ मधील चिनी आक्रमणाच्या प्रसंगाने या भोळसट, स्वतःमध्येच मशगुल असणाऱ्या देशाच्या विदेशी धोरणाचे आत्मघातक गर्भितार्थ अंशतः उघडकीस आणले. पं. नेहरूंनी कबुली दिल्या-प्रमाणे "आत्मनिर्मित काल्पनिक विश्वातून" या आक्रमणाने भारतीयांना बाहेर फेकले. परंतु हा धक्का तात्पुरताच ठरला. या आक्रमणाने दर्शित केलेल्या रहस्याचे स्वरूप म्हणजे चीनचे विस्तारशील धोरण आणि मोठी लष्करी शक्ती एवढेच आहे असे कोणी म्हणेल तर ते अर्धसत्य आहे. या प्रश्नाचे खरे स्वरूप म्हणजे भारताने आपण ज्या जगात राहतो त्या जगाचे वास्तविक स्वरूप ओळखण्याचे सतत नाकारले. शांततेची गरज आणि कल्पनारम्य ध्येय-वादावर आधारलेला शांततेचा व आर्थिक प्रगतीचा दृष्टिकोण जगावर लादण्याचा वस्तुवादास सोडून असलेला प्रयत्न भारताने केला. त्यामुळे, स्वतःच्या डोळ्यातील मुसळ दिसले नाही व दुसऱ्याच्या








डोळयातील कुसळ मात्र दिसले. या बाबतीत मित्र पण अपवाद ठरले नाहीत. या सगळ्या गोष्टींच्या मुळाशी स्वतःच्या लोकशाही राज्यसंस्थेच्या संरक्षणास द्यावी लागणारी खरी किंमत देण्यास आवश्यक असलेल्या प्रचंड इच्छाशक्तीचा अभाव हेच खरे कारण होय. त्यामुळेच १९६२ मधील घटनेनंतर आपण आपल्या जुन्या स्वप्नात परत रममाण झालो. या गेल्या सप्टेंबरमधील अघोषित युद्धाने आपले डोळे नीट उघडले आहेत अशी आशा बाळगून भारताच्या राष्ट्रीय स्वभावात मौलिक परिवर्तन घडण्याचा योग आला आहे असे समजू या. अनेक शतके जी सत्ये दृष्टिआड झाली होती, शब्दांच्या आतषबाजीखाली झाकली होती ती दृष्टिपथात आली आहे असेही समजू या. माणसामाणसातील वैयक्तिक संबंधांपेक्षा राष्ट्राराष्ट्रातील संबंध अत्यंत भिन्न प्रकारचे असतात. ही गोष्ट या आपत्तीच्या प्रसंगाने आपल्या उघडकीस आली आहे. तथाकथित मित्रांनी प्रशंसलेली तटस्थता आपल्यावरच उलटली आहे. लष्करी गटात सामील झालेले लहान राष्ट्रही उपग्रह म्हणून ताब्यात राहात नाही तेही स्वैरपणे बेपर्वाईने वागते हीही गोष्ट पाकिस्तानच्या वर्तनाने लष्करी गटांच्या निदर्शनास आली आहे. ब्रिटनची वृत्तपत्रे, बी. बी. सी., अमेरिकन वृत्तपत्रे यांच्या याप्रसंगी घडलेल्या वर्तनावरून हे उघडकीस आले आहे की, ते सुद्धा संधिसाधु बनतात व विश्वातील एका मोठ्या लोकशाहीशी तिच्या संकटकाळी उपेक्षा करतात. परंतु त्यामुळे आपण त्यांना दोष देण्यात अर्थ नाही कारण त्यांच्या संकट-प्रसंगी आपण न्यायनिष्ठेचा बहाणा करून त्यांचीही उपेक्षा केली आहे. राष्ट्राराष्ट्रांचे हितसंबंध स्थिरपणे समान राहतात ही गोष्टसुद्धा खरी नाही. प्रौढ व समंजस कोणतेही राष्ट्र दुसऱ्याची टीका व असहकार सहन करण्यास तयार असते. आपले मौलिक हित-संबंध त्या टीकेने व असहकाराने बाधित होणार नाहीत एवढीच काळजी घ्यावी लागते.

आंतरराष्ट्रीय व्यवहारात मैत्रीला विविध मर्यादा पडतात याचे प्रत्यंतर मिळाल्यानंतर त्यापासून दोन पुढील सत्ये ध्यानात येऊ लागतात. कोणत्याही राष्ट्राला स्वाभिमानाने जगण्याकरिता प्रसंगी दुसऱ्यांच्या मदतीची अपेक्षा न करताच जीवनाचा लढा लढावा लागतो; ज्यांची एका विशिष्ट प्रसंगी भरपूर मदत मिळू शकते व मोठा धोका पतकरण्याची तयारी असते तेसुद्धा एका दुसऱ्या विशिष्ट प्रसंगी पूर्ण तटस्थ राहतात. चीनने यावेळी जेव्हा निर्वाणीचा खलिता पाठविला तेव्हा अमेरिका पूर्वीसारखी धावून आली नाही. रशियाचे वर्तन मात्र पूर्वीपेक्षा अधिक सहानु-भूतीचे होते. पाकिस्तानला अमेरिकेने दिलेली लष्करी मदत पाकिस्तानने गैररीतीने वापरली म्हणून आपण अमेरिकेला दोष देतो. अमेरिका आपली झालेली चूक कबूल न करता दुरुस्त करणे शक्य आहे, याचीही दखल आपण घेतली पाहिजे.

(४)

आतापर्यंतच्या अनेक अनुभवांनी भारताचे नेते अधिक शहाणे झाले आहेत आणि आपल्या विदेश-विषयक राजनीतीला नवे वळण देण्यास तयार झाले आहेत, अशा आशावादास पुष्कळ पुरावा उपलब्ध होत आहे. नव्या पिढीतील नव्या प्रकारची कर्तबगार माणसे निवडून बौद्धिक व भावनात्मक नवी बैठक असलेले नेतृत्व वर कसे येईल यासंबंधी योजना कार्यान्वित करण्याची तयारी नेत्यांनी केली पाहिजे. नावडते परंतु परिस्थितीला तोंड देणारे निर्णय आत्म-विश्वासाने घेतले पाहिजेत. भारत प्रचंड लष्करी तयारी करण्यास सिद्ध झाला आहे, याची खात्री पाकिस्तान व चीन यांना पटविली पाहिजे. पश्चिमी राष्ट्रांना असे वाटू लागले आहे की, लोकशाही भारत चँग-कै-शेकच्या चीनसारखा दुर्बल व विनाशोन्मुख बनला आहे आणि लालचीन मात्र आर्थिक ,राजकीय व लष्करी सामर्थ्यानिशी अत्यंत प्रबल राष्ट्र म्हणून सिद्ध झाला आहे. चीनचे सामर्थ्य खरोखर किती आहे याचा खराखुरा अंदाज न घेताच अशा तऱ्हेची भावना जगात पसरविली जात आहे. चीनशी व्यापार वाढ-विण्याकरिता बिनकम्युनिस्ट पश्चिमी राष्ट्रे धडपड करीत आहेत. ही पार्श्वभूमी लक्षात घेऊनच भारताच्या विदेशनीतीला नवे वळण दिले पाहिजे. कोणत्याही राष्ट्राची विदेशनीती राष्ट्रीय हितसंबंधांचे संवर्धन करण्याचे साधन म्हणून तयार करावी लागते. राष्ट्रीय धोरणाचेच ते अंग असते. लोकशाहीत, निधर्मी राज्य-पद्धती, आर्थिक वाढ आणि सामाजिक न्याय ही चार आपल्या राष्टीय धोरणाची उद्दिष्टे होत. ही उद्दिष्टे

पार पाडण्याकरिता जगातील अन्य लोकशाह्यांचे सामर्थ्य वाढेल हा दृष्टिकोण आपल्या विदेशनीतीच्या धोरणात समाविष्ट होणे जरूर आहे. याचा अर्थ असा नव्हे की जगात अन्यत्र असलेल्या हुकूमशाहीवर कायम दंड उगारला पाहिजे. विद्यमान जगातील लोकशाही-विरुद्ध हुकूमशाही यांच्या लढ्यात लोकशाहीची बाजू आपण कधीच सोडता कामा नये. स्वतःचे राष्ट्रीय हितसंबंधांची सुरक्षितता अन्य राष्ट्रातील लोकशाहीच्या मजबुतीवर अवलंबून आहे हे विसरता कामा नये.

उत्तर व्हिएटनाममधील युद्धाचे पार्श्वभूमीवर या प्रश्नाचा उलगडा करता येतो. अमेरिका व रशिया यांच्यामधल्या विरोधाची तीव्रता कमी झाली असून लाल चीन व रशिया यांच्यामधला विरोध वाढीस लागला आहे. रशियाच्या हितसंबंधांना अमेरिकेपेक्षा लालचीनचेच भय अधिक आहे. ही गोष्ट रशियाच्या लक्षात आली आहे. आग्नेय आशियातील सत्ता-स्पर्धेत रशिया दोन विरुद्ध पातळीवरून राजकारण खेळत आहे व या दोन विरुद्ध पातळींचा संदर्भ लक्षात घेऊनच अमेरिकेच्याही हालचाली सुरू आहेत. अमेरिकेला लाल चीन नष्ट करता येऊ नये परंतु लालचीन दुर्बल झाला तर पाहिजे आणि आग्नेय आशियात आपले वजन युद्धाचा धोका टाळून वाढविता आले तर वाढवावयाचे, असे राजकारणी पवित्रे रशिया टाकीत आहे. म्हणून भारताची ताकद वाढविणे आणि अमेरिकेची या भागातील शक्ती खच्ची होऊ न देणे अशा प्रकारची उद्दिष्टे रशियाच्या विदेशनीतीमध्ये नव्याने समाविष्ट झाली आहेत.

भारताच्या विदेशनीतीच्या संदर्भात आक्रमक व क्रांतिकारी चिनी हुकूमशाही हा अत्यंत परिणाम-कारक असा मुद्दा आहे. या हुकूमशाहीच्या उद्देशात जवळच्या सर्व राष्ट्रांना स्वतःचे उपग्रह बदलणे किंवा पोखरून नष्ट करणे असा उद्देश समाविष्ट झाला आहे. आग्नेय आशियातील राष्ट्रांना दोन विकल्पांपैकी एक विकल्प निवडणे आवश्यक आहे. एक विकल्प म्हणजे पेकिंगच्या अटी मान्य करून किंवा दुसरा विकल्प म्हणजे चिनी आव्हान स्वीकारून एकजूट करणे. आग्नेय आशियातील भारताव्यतिरिक्त देशांना व्यक्तिशः किंवा एकजूट करून चीनच्या धोक्याचा सामना करीत राहण्याइतकी शक्ती नाही. त्याकरिता भारतच समर्थ होऊ शकेल. भारत समर्थ होईपर्यंत अमेरिकेला या दुर्बलांना संरक्षण देण्याकरिता मधे पडले पाहिजे. या बाबतीत अमेरिकेला काही अडचणी आहेत. त्या अडचणी भारताला नाहीत. आग्नेय एशियातील चीनचे आक्रमण थोपवून धरण्या-करिता ही भारताची जबाबदारी आहे आणि त्यात भारताचे मोठेपणही आहे. या जबाबदारीकडे दुर्लक्ष करीत राहिल्यास भारताचे स्वतंत्र राष्ट्र या नात्याने जगण्याचे सामर्थ्य हळूहळू घटत जाईल. आर्थिक व लष्करी दृष्ट्या स्वतःच्या ताकदीवर उभे राहिलेले लोकशाही राज्य असे भारताचे चित्र जगाला दिसले तरच त्याला आत्मरक्षणाचे आणि आग्नेय आशियाच्या नेतृत्वाचे उद्दिष्ट साध्य करता येईल. काश्मीरसारख्या सरहद्दीवरील छोट्या राज्याचा स्वयंनिर्णयाचा प्रश्न या व्यापक उद्दिष्टाच्या अनुरोधाने सोडविला पाहिजे. भारताची सुरक्षितता आणि अन्य राष्ट्राकडून होणाऱ्या संभाव्य आक्रमणाचा बंदोबस्त या दोन मुद्यांच्या अनुरोधाने काश्मीर प्रश्नाचा विचार करणे आवश्यक आहे. सरहद्दीवरील लहानशा राज्याला स्वयंनिर्णयाचे तत्त्व नाकारावे लागले तर मोठ्या उद्देशाच्या सिद्धीकरिता ते योग्य ठरेल . भारताच्या सरहद्दीवरील अन्य छोट्या राष्ट्रांनीही आत्महिता-करिता भारताशी सहकार्य करून आपली संरक्षण-व्यवस्था बळकट केली पाहिजे. लाल चीनचा धोका ही अत्यंत महत्त्वाची बाब त्यांनी मानली पाहिजे.

भारताची विदेशनीती वरील उद्देशाच्या साफल्या-स्तव समर्थ बनावी म्हणून अमेरिका व रशिया या दोन्ही राष्ट्रांशी विचारविनिमय करून सहानुभूती मिळविली पाहिजे. कम्युनिस्ट चीनच्या आक्रमणास पायबंद घालण्याकरिता भारताचा किल्ला मजबूत करणे हे उद्दिष्ट अमेरिका व रशिया या दोघांनाही मान्य होण्यासारखे आहे. अमेरिकेचे काही प्रामाणिक मतभेद असू शकतात. त्या मतभेदांनाही वाव देऊन सहकार्य मिळविण्याचा प्रयत्न आपण करणे आवश्यक आहे.










# भारत, पाक व आतरराष्ट्रीय राजनीती

पाकिस्तान व चीन या दोघांची तुलना करता चीन पाकिस्तानपेक्षा कितीतरी पटीने धोक्याचा आहे ही गोष्ट प्रथम ध्यानात ठेवली पाहिजे. पाकिस्तान त्रास देऊ शकते; पराभूत करू शकत नाही हा त्या दोघामधला महत्त्वाचा फरक आहे. चीनच्या प्रत्यक्ष सहकार्याशिवाय भारताला हतबल करणे पाकिस्तानच्या कुवतीत नाही. चीनला थोपवून धरण्याचे राजकारण व युद्धकारण चालविणे यातच भारताची खरी कसोटी आहे.

लालचीनला धडा शिकविण्याइतके लष्करी सामर्थ्य निर्माण करण्याकरिता मित्रराष्ट्रांकडून जास्तीत जास्त मोठे साहाय्य मिळविण्याशिवाय भारतास वर्तमानकाळी सद्यस्थितीत दुसरे गत्यंतर नाही. चीनशी प्रत्यक्ष युद्ध सुरू झाले तर सोविएट रशिया भारतास संपूर्णपणे साहाय्य देण्यास तयार होईल की नाही याबद्दल शंका बाळगण्यास पुष्कळ जागा आहे. लाल चीनच्या विरुद्ध युद्धमान राष्ट्राला रशिया मदत करू लागल्यास रशियामध्येच खुद्द बंड निर्माण होण्याचा संभव आहे, अशा प्रकारची शंका अमेरिकेच्या बाबतीत घेण्याचे काही कारण नाही. भारताला राज्यविस्ताराची महत्त्वाकांक्षा नाही ही गोष्ट अमेरिकेला व रशियाला पटविता येण्यासारखी आहे. कम्युनिस्ट चीनच्या विस्ताराला पायबंद घालणे हे भारताच्या विदेशनीतीचे अंग आहे ही गोष्ट अजून स्पष्ट झालेली नाही. ही गोष्ट भारताने स्पष्ट केल्याशिवाय आग्नेय आशियातील राजकारणात भारताचे नक्की स्थान काय याचे स्पष्टीकरण मित्र, शत्रू, व तटस्थ या तिघांनाही अजून मिळालेले नाही. शास्त्री सरकारची जी परंपरा आहे त्या परंपरेत या मुद्याचे स्पष्टीकरण सापडत नाही.

काश्मीरचा प्रश्न सुटण्याच्या मार्गात भारतापेक्षा पाकिस्ताननेच खऱ्याखुऱ्या अडचणी उभ्या केल्या आहेत, असे गेल्या सोळा वर्षांच्या इतिहासावरून स्पष्ट होते. काश्मीर प्रश्न काश्मीरी जनतेच्या इच्छेप्रमाणे सोडविण्याची जबाबदारी मुख्यतः भारतावर आहे. परंतु तो प्रश्न सोडविण्याच्या मार्गात पाकिस्तानने आक्रमण करून अडथळा उत्पन्न केला आहे हे श्री. जयप्रकाश यांचे मत या संदर्भात विचारात घेण्यासारखे आहे. काश्मीरचे लोकमत अजमाविण्याची संधी पाकिस्तानच्या विचित्र वर्तनामुळे दुरावली आहे. पहिल्या आक्रमणानंतर शस्त्रसंधी करताना आपले सैन्य काश्मीरमधून काढून घेतले असते तर त्याचवेळी लोकमताचा कौल घेणे शक्य झाले असते. पाकिस्तान व चीन हे दोन्ही या संबंधात जबाबदार आहेत. लोकशाही राज्यपद्धती व लोकशाही प्रशासन काश्मीरमध्ये दृढमूल करणे एवढाच मार्ग सध्या भारतास मोकळा दिसत आहे. १९६२ पासून भारताच्या सरहद्दींचे रक्षणाच्या प्रश्नाशी काश्मीरचा लोकमत अजमावण्याचा मुद्दा गुंतला आहे. रशियाची सैन्ये रशिया बाहेरच्या देशात शस्त्र परजून उभी आहेत. ब्रिटन, ब्रिटनची सत्ता, जिब्राल्टर, हाँगकाँग येथे पाय रोवून बसली आहे. आणि युनायटेड स्टेटस् ऑफ अमेरिका क्यूबामध्ये व लॅटिन अमेरिकेमध्ये वारंवार हस्तक्षेप करीत आहे. या गोष्टींकडे कानाडोळा करणे संयुक्त राष्ट्रांना परवडते. परंतु भारताने लोकशाही पद्धतीने काश्मीरमध्ये रोवलेली आपली सत्ता संयुक्त राष्ट्रांना पाहवत नाही ही गोष्ट अगदी विचित्र आहे. हे काही जरी असले तरी एवढे मात्र खरे की भारताने आपल्या विदेशनीतीमध्ये परिवर्तन करून स्पष्ट अशा नव्या उद्दिष्टांचा समावेश करून तटस्थ व मित्र राष्ट्रांना त्याची जाणीव होईल अशा प्रकारे पावले टाकली पाहिजेत. आपल्या उच्च ध्येयांचे संरक्षण केवळ स्वार्थत्यागाच्या तयारीने होणार नाही. कोणाचा पक्ष न्याय्य व कोणाचा अन्याय्य असा दृष्टिकोण धरून पाकच्या संदर्भात राजकारण यशस्वी होण्याची शक्यता दिसत नाही. चीनची आशियातील महत्त्वाकांक्षा लक्षात घेऊनच पाक–भारत प्रश्न सोडविण्याची गरज आहे. परंतु त्याकरिता काही काळ जाऊ देणे आवश्यक आहे. पाकलष्कराला चांगलीच अद्दल घडली आहे; काश्मीरमध्ये जनतेचा उठाव पाकच्या अपेक्षेप्रमाणे झाला नाही; चीनानुकूल भुट्टोप्रभृतींचा कट्टर गट पूर्वी इतका प्रभावी न राहता तडजोडवादी गटाचे वजन वाढण्याची शक्यता अधिक आहे. म्हणून काही काळपर्यंत सबूरीने घेतल्यास दोघास समाधानकारक मार्ग अमेरिका व रशिया यांच्या मध्यस्थीनेच निघेल. बहुतेक काश्मीरचे विभजन हाच तो मार्ग ठरेल. हीच गोष्ट 'अर्थपूर्ण सोडवणूक' या आयूबखानाच्या उक्तीवरून सूचित होते.










काश्मीरच्या बाबतींत भारताची प्रथमची भूमिका-सुद्धा तडजोडवादीच होती. ती अलीकडे सुटलेली असली तरी अधिक महत्त्वाच्या प्रश्नांना तोंड देण्याकरिता त्याच पहिल्या भूमिकेकडे वळण्याची वेळ आली तर तिचा फायदा घ्यावा. लोकशाहीविरुद्ध हुकूमशाही अशा विश्वव्यापी संघर्षात पाकला मित्र करणे किंवा निदान तटस्थ ठेवणे भारताच्या हिताचे ठरेल. पाकच्या दुर्बल हुकूमशाहीपेक्षा चीनची अत्यंत बलाढ्य हुकूमशाही हेच नव्या विदेशनीतीचे मुख्य लक्ष्य बनले तर भारताची राजनीती सर्वांगीण बनेल.

( ५ )

नव्या विदेशनीतीला नव्या लष्करी व आर्थिक धोरणाची आवश्यकता आहे. आग्नेय आशियात भारताला आपले इष्ट कर्तव्य बजावण्याचा निर्धार असेल तर ती गोष्ट अमेरिकेस पटविली पाहिजे. काश्मीरप्रश्नाचा योग्य निकाल लागेपर्यंत लष्करी मदत तर राहोच पण आर्थिक मदतीवरही अनिष्ट परिणाम घडणार आहे. चिनी संकट मात्र सतत वाढत राहील, त्याचा अणुअस्त्रांचा धोकाही सुसज्ज होत राहील व अणुअस्त्रे चालविण्याच्या बाबतीत चीन विधिनिषेध बाळगणार नाही. या धोक्याचा सामना बाहेरील भरभक्कम मदतीशिवाय करता येणे फारच कठीण आहे. परंतु प्रत्यक्ष हल्ला झाल्यावर काही काळपर्यंत तरी तो हल्ला सामना करीत रेटण्याइतकी ताकद भारताने वाढविली पाहिजे. दुसऱ्या महायुद्धातील ब्रिटनचे उदाहरण या संदर्भात ध्यानात घेण्यासारखे आहे. बाहेरची भक्कम मदत येईपर्यंत प्रत्यक्ष युद्धपरिस्थितीत काही काळपर्यंत टिकाव धरणे अगत्याचे असते. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी हिटलरपाशी युद्धाचा निकाली निर्णय लावणारा अणुबाँब नव्हता. तो आता माओत्सेतुंगपाशी आहे, हाही फरक ध्यानात घेणे जरूर आहे. या करिता भारतानेही चीनच्या संभाव्य आक्रमणास धाक दाखविण्याकरिता स्वतःच्या अण्वस्त्रांचीही तयारी केली पाहिजे. या संबंधात अमेरिका व रशिया यांची बरोबरी भारत करू शकणार नाही. परंतु चीनशी बरोबरी करणे शक्य आहे आणि लष्करी गरज व मनोधैर्याची जपणूक याकरिता त्याची जरूरी आहे. परक्यांच्या अण्वस्त्रांच्या छत्राने चीनला अडविणे कठीण आहे; भारताच्या हाती अण्वस्त्रे पाहिजेत; मग ती परकीय मदतीची असोत वा स्वतः तयार केलेली असोत. अण्वस्त्रछत्राच्या केवळ आश्वासनावर भारताने अवलंबून राहू नये.

भारतीय लोकशाहीला धक्का न लागता या गोष्टी व्हावयाच्या तर जनतेचा विचारपूर्वक पाठिंबा असलेले निर्णय धडाडीने घेतले पाहिजेत. अण्वस्त्रनिर्मितीचा पंचवार्षिक कार्यक्रम आखून प्रतिवर्षी सहाशे कोटी रुपयांची अधिक तरतूद करावी लागेल म्हणजे पाच हजार रुपयांखेरीज संरक्षण खर्चात आणखी सहा हजार रुपयांची तरतूद पुढील पांच वर्षांकरिता करावी लागेल. परंतु ही तरतूद करताना जनतेला सहन करावे लागणारे हाल असह्य होणार नाहीत याचीही खबरदारी घ्यावी लागेल.

इच्छा व ध्येयाचे स्पष्टदर्शन असेल तरच हे असे करणे शक्य आहे. नियोजनाच्या पायात परिवर्तन, प्रशासन खर्चात व लाल फितीत निर्दय कपात, सरकारी सार्वजनिक उद्योगाच्या अवास्तव गुणगानाच्या सवयीत बदल व उपयुक्ततावादावर भर यांच्या योगाने भारताच्या आर्थिक नियोजनामध्ये ही गोष्ट प्रतिबिंबित झाली पाहिजे. खाद्यान्नाचा पुरवठा रेशनिंगच्या द्वारा करण्याकरिता प्रादेशिक राज्यांच्या अन्नक्षेत्राच्या मर्यादा काढून टाकल्या पाहिजेत; खाजगी क्षेत्रावरील सरकारी नियंत्रणाचा विस्तार कमी केला पाहिजे. उदाहरणार्थ इंजियरिंग उद्योगामधील पन्नास टक्के शक्ती रेंगाळत पडली आहे. सरकारने हे उद्योग स्वतःच्याच क्षेत्रात अडवून ठेवले नसते तर ही पन्नास टक्के शक्ती कामी आली असती, कामगारवर्गाची काळजी घेण्यात मात्र कुचराई होणार नाही याची खबरदारी या संदर्भात लक्षात घेणे जरूर आहे. निश्चयपूर्वक परिवर्तन केल्यास उत्पादनवाढीस वेग येईल व प्राप्तीची विषमता ही घटावयास लागेल. याकरिता गरज जर कशाची असेल तर अन्तर्गत व विदेशी धोरणात मौलिक परिवर्तन करण्याची. अगोदर अवलंबिलेल्या घोरणात बदल करण्यास माणसाने आपला अहंकार आडवा येऊ देता कामा नये हे सत्य मान्य केल्यास भूतकाळाची चूक भोवत नाही.



अनुक्रमणिका








"उद्यमेन हि सिद्ध्यन्ति कार्याणि न मनोरथैः ।
न हि सुप्तस्य सिंहस्य प्रविशन्ति मुखे मृगाः ॥"















अनुक्रमणिका

श्री. मा. रा. कटक

# शेजवलकरांच्या
# संकलित- शिवचरित्रग्रंथाचे श्री. टिकेकरकृत परीक्षण

एका विद्वानाने म्हटले आहे : " A historian is the mirror of truth, while his critic is its caricature. " या विधानातील विनोदाचा व अतिशयोक्तीचा भाग जरी सोडून दिला तरी त्यामागील सूचक अर्थ खरा आहे. तो म्हणजे, इतिहासकार व त्याच्या इतिहासवाङ्मयावर टीका करणारा टीकाकार हे दोघे एकमेकास साहाय्यक ठरले पाहिजेत, हा होय. इतिहासकार हा सत्याचा प्रकाश दाखविणारा सूर्य, तर टीकाकार हा त्या सूर्याचे बिंब परावर्तित करणारा आरसाच. दोघात असलेल्या अशा प्रकारच्या नात्यामुळेच, इतिहासलेखकाच्या लेखनामागील हेतु व भूमिका यांच्याशी पूर्णपणे तादात्म्य पावण्याची फार मोठी जबाबदारी इतिहासटीकाकारावर पडते. ती त्याने पार न पाडल्यास इतिहासकारावर अन्याय होऊन, त्याच्या लेखनाचे हास्यचित्र तयार केल्याचा दोष टीकाकारास लागतो.

'नवभारत'च्या १९६५ च्या जुलै व ऑगस्ट महिन्यांच्या अंकात कै. प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर यांच्या संकल्पित शिवचरित्रग्रंथावर महाराष्ट्रातील एक नामवंत टीकाकार श्री. श्री. रा. टिकेकर यांचे दोन परीक्षणलेख प्रसिद्ध झाले आहेत. त्यातील पहिला (पूर्वार्ध), कै. शेजवलकरांनी लिहिलेल्या शिवचरित्राच्या अपूर्ण भागाचे परीक्षण करणारा असून, दुसऱ्यात (उत्तरार्धात) त्यांनी आपल्या मदतनिसाकडून, म्हणजे माझ्याकडून काढवून घेतलेल्या टिपणांचे मूल्यमापन आलेले आहे. शेजवलकरांच्या अकस्मात् निधनाने निर्माण झालेल्या काही एका विशिष्ट परिस्थितीत मुंबईच्या मराठा मंदिरास त्यांचा ग्रंथ अपूर्ण स्वरूपात शिवचरित्रसाधनग्रंथ म्हणून प्रसिद्ध करावा लागला. त्यामुळे या शिवचरित्रसाधनग्रंथाचे परीक्षण करावयाचे झाल्यास, ते करण्यापूर्वी तो प्रकाशित व संकलित करणारांची (मंदिराची व माझी) तसेच खुद्द शिवचरित्रकार शेजवलकरांची शिवचरित्र लिहिण्यामागील वैचारिक बैठक नीट समजावून घेण्याची जबाबदारी टीकाकारांवर पडते. या दृष्टिकोनातून श्री. टिकेकरांचे परीक्षण कितपत योग्य झाले आहे ते पाहिले पाहिजे. शिवचरित्र लिहिण्याच्या कामातील शेजवलकरांचा मदतनीस या नात्याने मलाच ती कामगिरी उचलणे भाग आहे.

सुरुवातीलाच टिकेकरांच्या टीकेतील विधायक भागाचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे. माझ्या टिपणात झालेले कालविपर्यास, व्यक्तिनामविपर्यास, कालानुक्रमाचा व एकाच कालमानाचा अभाव, काही स्थळांच्या भौगोलिक स्थानांसंबंधीचे अज्ञान, यासंबंधींचे तसेच खुद्द शेजवलकरांच्या लेखनांतील व्यक्तिनामांच्या व पदनामांच्या वापरातील ढिलेपणाचे दोष त्यांनी स्पष्टपणे दाखविले आहेत. विशेष म्हणजे टिपणातील वरील चुकांचे खापर शेजवलकरांच्या माथी न फोडता मला त्याबद्दल जबाबदार धरून टिकेकरांनी शेजवलकरांच्या संशोधनपद्धतीच्या अचूकपणाबद्दल आदर व्यक्त केला आहे. या गोष्टीबद्दल मी त्यांचा शतशः आभारी आहे.

शिवचरित्रसाधनग्रंथाचे स्वरूप मात्र टिकेकरांनी नीटसे समजावून घेतलेले नाही. शिवचरित्राचा अपूर्ण भाग व सहा टिपणे खुद्द शेजवलकरांच्या हातची असून बाकीच्या याद्या टिपणकारांच्या आहेत अशी वाचकांची चुकीची समजूत त्यांनी करून दिलेली आहे. शिवचरित्राचा अपूर्ण भागच काय तो शेजवलकरांच्या हातचा असून, टिपणे व बाकीच्या सर्व याद्या त्यांच्या मार्गदर्शनाखाली मी स्वतंत्रपणे तयार केलेल्या आहेत. शेजवलकरांनी लिहिलेल्या प्रकरणांखालील आधारही मीच दिलेले आहेत. शेजवलकरांच्या हातचा शिवचरित्राचा भागच काय तो अपूर्ण असून टिपणे मात्र परिपूर्ण आहेत असा टिकेकरांचा आणखी एक गैरसमज झालेला आहे. वस्तुतः शेजवलकरांच्या अकाली निधनामुळे शिवचरित्रातील

किती तरी महत्त्वाच्या भागांवर व अंगांवर टिपणे काढावयाचे काम पूर्ण करता आले नाही. जेवढी टिपणे त्यांनी माझ्याकडून काढवून घेतली तेवढी इतर इतिहास-संशोधकांस उपयोगी पडतील या विचाराने मराठा मंदिराने ती छापली आहेत. अवरंगजेबास टिपणकाराने फक्त सहा ओळी बहाल केल्याची टिकेकरांची तक्रार एरवी रास्त ठरली असती; पण वरील संदर्भात ती योग्य नाही. शिवाजी-अवरंगजेब संबंधाचा अभ्यास शेजवलकर अर्धांगाने आजारी पडण्यापूर्वी दोनच दिवस आधी सुरू झाला होता. 'सतराव्या शतकांतील हिंदुस्थान' या प्रकरणात हा शिवाजी-अवरंगजेब संबंधाचा भाग यावयाचा होता.

लक्षात ठेवावयाची महत्त्वाची गोष्ट म्हणजे शेजवलकरांचा किंवा माझा टिपणे काढण्यातील हेतु ती छापण्याचा नव्हता. केवळ आमच्या दोघांच्या सोयीसाठी व माहितीसाठी आम्ही ती काढली. ती छापावी लागली शेजवलकरांच्या देहावसानामुळे. माझ्या कित्येक टिपणात नुसतेच त्रोटक उल्लेख दिलेले असून त्याचा आगापिच्छा व संदर्भ आम्हां दोघासच माहीत होता. टिपणे छापली जात असतां ग्रंथांत तो देणे ग्रंथाच्या पृष्ठमर्यादेच्या व इतरही काही कारणामुळे ते शक्य नव्हते. त्यामुळे टिपणात पुष्कळशा त्रुटी राहिलेल्या आहेत याची मला जाणीव असूनही माझा त्या बाबतीत अगदीच नाइलाज होता. पुष्कळ ठिकाणी स्थळांची निश्चिति नाही अशी टिकेकरांनी टीका केली आहे. पण ग्रंथाच्या सुरुवातीलाच ' संकलनाची दिशा 'मध्ये मी स्पष्टपणे नमूद केलेले आहे की, स्थलांची व व्यक्तींची निश्चिति या ग्रंथात झालेली नसून, व्यक्ति व स्थळे यांच्या अनुक्रमाने ऐतिहासिक घटनांचे संकलनच फक्त त्यात दिलेले आहे. ' शिवाजीचा मुलूख ' या टिपणात देखील स्थळनिश्चिति न झाल्याची टीप दिली आहे. शेजवलकरांचे कोणत्याही प्रसंगावरील अंतिम निर्णय टिपणांमध्ये न आल्याचेही ' संकलनाची दिशा 'मध्ये मुद्दाम सांगितलेले आहे. ज्या ठिकाणी मत दिल्यासारखे वाटते ते अंतिम निर्णयाचे द्योतक नसून, विशिष्ट आधारावरून काढलेला तो तात्पुरता निष्कर्ष आहे.

टिपणे वाचण्याची पद्धति बरोबर न समजल्याने टिकेकरांचा काही ठिकाणी घोटाळा उडालेला आहे. 'अफजलखान क्रूर व कडवा नसावा ' हे माझे मत असल्याचा त्यानी ग्रह करून घेतला आहे, त्या वाक्यापुढे दोन तीन ओळींनंतर मी दिलेला अफजलखानवध, पृ. ११, हा आधार लक्षपूर्वक वाचण्याची त्यानी तसदी घेतली असती तर, ते माझे मत नसून ' अफजलखान-वध ' या पुस्तकाचे लेखक श्री. वि. ल. भावे यांचे आहे, हे त्यांस कळले असते. " चंपा-विवाहासंबंधी टिपणातील निर्देश ( पृ. ४४९ ) अवास्तव आहे " असा एक दोष त्यानी दाखविला आहे. पण तो निर्देश माझा नसून श्री. वा. सी. बेंद्रे यांचा आहे. " वरील सर्व मुद्दे श्री. वा. सी. बेंद्रेलिखित ' छत्रपति संभाजी महाराज ' ग्रंथाच्या प्रकरण ७ मधून घेतले आहेत " अशी टीप टिपणाखाली मुद्दाम मी कंसात दिली आहे. ती टिकेकरानी नजरेखालून घातली असती तर टिपणातील सर्व आधार बेंद्र्यांचे आहेत, माझे नव्हेत, हे त्याना सहज कळण्यासारखे होतो. बेंद्र्यांचे आधार पुष्कळ ठिकाणी चुकले आहेत हे माहीत असूनही, ते इतिहाससंशोधकानी तपासून पहावेत या हेतूने मी मुद्दाम त्यांचा उल्लेख केला आहे. कारण ग्रंथाचा हेतु आधार चूक की बरोबर ठरविणे हा नसून, ते कोठे आले आहेत व कोणी दिले आहेत याचे दिग्दर्शन करण्याचाच फक्त आहे. या चष्म्यांतूनच टीकाकारानी टिपणाकडे पाहिले पाहिजे. चंपा-संभाजी विवाहाचा कै. गोडे व श्री. बेंद्रे यानी रंगविलेला प्रसंग पूर्णतया खोटा असून, तो विवाह शंभुदास देसायाचा होता, असे शेजवलकरांचे मत होते व माझेही तेच आहे.

टिपणकाराने विनोद साधले आहेत हे दाखविण्यासाठी "ते समयीं राजाराम याची मातुःश्रीस ऋतु प्राप्त झाला" हे वदतोव्याघाताचे उदाहरण टिकेकरांनी दिले आहे. वास्तविक एक्याण्णव कलमी बखरीतील ते वाक्य मी बखरीतील संपूर्ण उताऱ्यासह अवतरण चिन्हात दिलेले आहे. विनोदनिर्मिति करण्यात मी निष्णात आहे हे उघड करण्यासाठी खुद्द शेजवलकरांच्या लिखाणातील "येथील राजा प्रतिदिवशी स्वतःच्या मुसलमानी धर्माचा कट्टर अनुयायी होत आहे " ( पृ. १२७ ) हे वाक्य माझ्या माथी मारण्यासदेखील टिकेकरांनी मागे पुढे पाहिलेले नाही. ते वाक्य जर माझे होते असे त्यांचे म्हणणे, तर त्यांनी ते माझ्या टिपणातून काढून दाखवावयास हवे होते.








'चुकांची दुरुस्ती' प्रथम लक्षात घेऊन मग ग्रंथ वाचावयास घेणे हा टीकाकाराच्या नीतिनियमातील महत्त्वाचा नियम होय. पण तोही न पाळता, "शिवाजी वैष्णव असल्याचे चिन्ह कोणते? तर तो तुळजाभवानीस बकऱ्याचा बळी देत असे!" अशी गैरलागू टीका टिकेकरांनी केली आहे. 'शुद्धिपत्रा'त 'असल्याचे'च्या ठिकाणी 'नसल्याचे' अशी दुरुस्ती केलेली असल्याने त्यांच्या आक्षेपाचा पायाच ढासळतो. वैष्णव मताची व्यक्ति हिंसाचाराला कधी उत्तेजन देईल काय? महाराजांनीं ते दिले. यावरून ते वैष्णव नसल्याचे सहज सिद्ध होते. महाराज वैष्णव नसून शैव होते हे माझे मत ग्रंथात दडपलेले नसून ते खुद्द शेजवलकरांचेच होते, ही गोष्ट प्रस्तावनेच्या पृ. २८ वर टिकेकरांस आढळून येईल.

टिकेकरांनी शिवचरित्रग्रंथाच्या परीक्षणाबद्दल जी भूमिका धारण केली आहे तिच्यामुळे केवळ माझ्यावरच नव्हे तर मराठा मंदिराच्या चालकांवरही अन्याय झालेला आहे. त्यांनी म्हटले आहे, "शेजवलकरांनी न पाहिलेले पण त्यांच्या मदतनिसांनी त्यांच्यासाठी तयार केलेले लिखाणही या शेजवलकरांच्या साहित्यांत छापले असल्याने, शेजवलकरांच्या परिपक्व मतांबरोबर त्यांच्या मदतनिसांची अर्धी कच्ची मते मिसळलेली असावी, असे समजून परीक्षण करावे लागते." या या वाक्याचा अर्थ, शेजवलकर वारले, आता भली संधी मिळाली, असा विचार करून मी माझे अपरिपक्व लिखाण शेजवलकरांच्या लिखाणात दडपून दिले व मराठा मंदिराच्या चालकांनी मला त्यांत साथ तरी दिली असावी किंवा माझ्या करणीकडे काणाडोळा केला असावा! हा 'आरोप' करण्यामागची दोन कारणे टिकेकरांनी दिली आहेत. एक म्हणजे शेजवलकरांच्या ग्रंथातील "बसरूरची स्वारी" हे प्रकरण पूर्णपणे शेजवलकरांच्या लेखनशैलीविरहित असून, त्याची सुरवात छापणी वगैरे सर्वच दृष्टींनी ते 'पोरकट' आहे. दुसरी गोष्ट अशी की, या ग्रंथात आलेली काही विधाने इतकी परस्परविरोधी अर्थाची व त्यामुळे विसंगत वाटतात की शेजवलकरांसारख्या महापंडिताने तशी चूक केली असेल हे संभवनीय नाही. खरे म्हणजे टिकेकरांसारख्या जबाबदार टिकाकाराने हा 'आरोप' करताना शंभरवेळा विचार करावयास हवा होता. या बाबतीत स्वतःच्या संशयाची मराठा मंदिराच्या चालकांकडे चौकशी करून त्यांनी निवृत्ति करून घ्यावी हे बरे. मंदिराच्या कचेरीत शेजवलकरांचे मूळ लिखाण अजूनही व्यवस्थितपणे राखून ठेवले आहे.

'बसरूरची स्वारी' हे प्रकरण पूर्णपणे शेजवलकरशैलीविरहित असल्याचे टिकेकर ठासून सांगतात याचे कारण, शेजवलकरांचे सर्व उपलब्ध ऐतिहासिक वाङ्मय पूर्णपणे न वाचताच त्या इतिहासशार्दुलाच्या ग्रंथावर त्यांनी आपले टीकास्त्र सोडले आहे! Deccan College Bulletin 1943, Vol. 4, No. 2 मध्ये शेजवलकरांनी Shivaji's Raid On Basrur हा इंग्रजी लेख लिहिला होता. त्यावरूनच शिवचरित्रग्रंथातील आपला मराठी लेख त्यांनी सजविला आहे (भाषांतर नव्हे). दोन्ही लेखातील विचार अगदी तंतोतंत सारखेच आहेत. सदर मराठी लेख शेजवलकरांच्या हातून लिहून होताच डेक्कन कॉलेजच्या मराठा हिस्टरी म्युझियमचे क्युरेटर श्री. सासवडकर यांनी तो वाचूनही पाहिला होता. त्या लेखास टिकेकर 'पोरकट' म्हणतात, कारण शेजवलकरांच्या लिखाणातील संशोधनाचा बारकावाच त्यांच्या लक्षात आलेला नाही. त्यांस अशी विनंति आहे की प्रथम सभासद बखरीतील पाच ओळींचे आणि इंग्रजी व डच पत्रातील काहीसे विस्तृत असे बसरूरच्या स्वारीचे वर्णन त्यांनी वाचावे. नंतर सर यदुनाथ सरकार व सरदेसाई यांनी केलेली त्रोटक वर्णने डोळ्याखाली घालून त्यांची शेजवलकरांच्या इंग्रजी व मराठी लेखांशी त्यांनी तुलना करावी. म्हणजे प्रतिभावान इतिहासकार केवळ भूगोलज्ञानाच्या अचूकतेवर आपले लेखन कसे नटवू शकतो याचे मर्म त्यांस उमगून येईल. सरदेसाई व सरकार यांच्या लक्षांत न आलेल्या तीन गोष्टी आपल्या संशोधकीय तीक्ष्ण दृष्टीने शेजवलकरांनी उजेडात आणल्या आहेत. इंग्रजी पत्रात ज्याचा उल्लेख Mawlunda असा येतो ते ठिकाण मालवण नसून मालोंड बंदर आहे हे त्यांनी मालोंडीच्या खाडीच्या हृद्य वर्णनाने पटवून दिले आहे. सरकार व सरदेसाई मात्र शेवटपर्यंत महाराज मालवणाहून बसरूरला निघाले असेच समजत होते हे त्यांच्या अखेरच्या ग्रंथावरून समजून येईल. बसरूर हे ठिकाणदेखील







शेजवलकरांनीच निश्चित केले आहे. त्यासाठी त्या ठिकाणाचे त्यांनी केलेले भौगोलिक वर्णनही मुळातच वाचून बघण्यासारखे आहे. बसरूरच्या धाडीचा दिवस कोठेहि नोंदला गेला नसता केवळ गणिताच्या व ज्योतिषशास्त्राच्या आधारे त्यांनी तो १३ किंवा १४ फेब्रुवारी १६६५ ठरविली हे कौतुकास्पद नाही असे कोण म्हणेल ? महाराजांच्या या एकमेव आरमारी स्वारीचे महत्त्व सर्वांच्या नजरेस प्रथम कोणी आणून दिले असेल तर ते शेजवलकरांनीच.

'बसरूरच्या स्वारी'चे प्रकरण मदतनिसाचे असावे हे सिद्ध करण्यासाठी, मी टिपणात बसरूर व बिदनूर या नावांचा घोटाळा केल्याची तक्रार टिकेकर पुनःपुनः करतात. वस्तुतः दोन्हींची टिपणे मी वेगळी वेगळी दिलेली असल्याने टिकेकरांचा घोटाळा होण्याचे काही एक कारण नव्हते. शिवाय बसरूरबद्दल निरनिराळया साधनात आलेली निरनिराळी नांवे मी टिपणात दिली असली तरी, शेंजवलकरांनी बसरूर हे नांव निश्चित केल्याचे अगदी निःसंदिग्ध शब्दांत सांगितले आहे. बसरूरच्या भौगोलिक स्थानाची निश्चित कल्पना यावी म्हणून शेजवलकरांच्या इंग्रजी लेखात छापलेला नकाशा शिवचरित्रग्रंथात छापण्यासाठी दिला होता. काही तांत्रिक अडचणींमुळे ऐनवेळी तो छापता आला नाही. बसरूर प्रकरणाची सुरुवात टिकेकरांना घेवड्याच्या वेलाच्या जॅकसारखी वाटली याचे कारण मुळात ते स्वतंत्र प्रकरण नसून 'जयसिंगाचीं स्वारी' या मुख्य प्रकरणाचे उपप्रकरण आहे. आराखड्यावरून टिकेकरांसारख्या चाणाक्ष माणसाच्या लक्षांत ही गोष्ट यावयास पाहिजे होती. मुख्य प्रकरणाचा आधीचा भाग लिहून होण्यापूर्वीच बसरूर प्रकरण शेजवलकरांनी लिहावयास घेतल्यामुळे त्या भागाचा सारांश शेजवलकरांना थोडक्यात पहिल्या परिच्छेदात द्यावा लागला. सबंध मुख्य प्रकरण लिहून होतें तर बसरूर प्रकरणाची सुरुवात वेगळीच झाली असती व त्याचे आगळेच महत्त्व लक्षात भरले असते. इंग्रजी लेख स्वतंत्र असल्याने त्याची सुरुवात भिन्न प्रकारची आहे. ती टिकेकरांनी अवश्य पहावी ही त्यास विनंति.

माझी पुढील मते ग्रंथांत घुसडल्याची टिकेकरांनी नोंद केली आहे— ( १ ) शिवाजी नेहमी घोड्यावर स्वार होऊन दूर जाई ही समजूत सर्वदा खरी नाही. शक्य तेथे तो पालखीतूनच आरामाने जाई. त्याने अकारण आपला जीव धोक्यात घालण्याचे टाळलेले दिसते. ( पृ. ६७ ) ( २ ) अशक्यप्राय गोष्टी अंगावर घेण्याकडे शिवाजी महाराजांचा कल नव्हता. ( ३ ) शिवाजी राजकीय आघाडीवर जिंकला, पण कौटुंबिक आघाडीवर पराभव पावला ? ( ४ ) शिवाजीची तुलना जगातील थोर पुरुषांशी करणे मुळातच चूक. वास्तविक यातील कोणतेही मत माझे स्वतःचे नसून, पहिली दोन शेजवलकरांची आहेत. तिसरे महाराष्ट्रातील एका विचारवंताचे असून, चौथे इतिहासशास्त्रातील एक वैचारिक प्रवाह म्हणून चर्चेस घेतलेले आहे. पण या चारही विधानांचा त्यांच्या मागच्या पुढच्या संदर्भांत अर्थ लावून शेजवलकरांना नेमके काय सांगावयाचे आहे हे जाणून घेण्याचा प्रयत्न न करता टिकेकरांनी त्यांचा स्वतःच्या मनाला मानेल तसा अर्थ लावला आहे. साहजिकच त्यात परस्परविसंगति आहे असे त्यास वाटल्याने, त्या दोषातून शेजवलकरासारख्या थोरास वाचविण्यासाठी, त्यानी त्या विधानांचे खापर माझ्या डोक्यावर फोडण्याचा अव्यापारेषु व्यापार करून लहानाचा बळी दिला. या विधानांचे शेजवलकरांना कोणते अर्थ अभिप्रेत होते हे पाहणे त्यामुळे महत्त्वाचे ठरते.

पहिल्या विधानाने टिकेकरांचा आणि इतरही टीकाकारांचा फार मोठा गैरसमज झालेला आहे. 'महाराज पालखीतून आरामाने जात व अकारण आपला जीव धोक्यात घालण्याचे त्यांनी टाळले.' या वाक्यावरून महाराज ऐषआरामी होते व ते जिवास फार जपत असे अर्थ लावून बहुतेक टीकाकारांनी शेजवलकरांविरुद्ध एकच गदारोळ उडवून दिलेला आहे. या टीकाकारांनी शेजवलकरांचे सिद्धांत ऐतिहासिक निकषावर घासून ते हिणकस दिसल्यास खुशाल ठोकरून द्यावेत; पण त्यांच्या हेतूचा विपर्यास करून त्यांच्यावर आग पाखडू नये, अशी त्यास विनंति आहे. महाराज खरोखरीच जिवाला जपणारे व ऐषआरामी असते तर त्यांच्या हातून स्वराज्य स्थापण्याचे महत्कार्य झाले असते की नाही याचे उत्तर एखादा शाळकरी पोरही







देईल. आणि अशा विलासी व भ्याड व्यक्तीस 'आदर्श राष्ट्रीय महापुरुष' मानून शेजवलकरांसारखा इतिहास-शार्दूल त्याचे गद्य शिवभारत रचण्यास मांडी ठोकून कसा बसला, याचा टीकाकारांनीच समर्पक रीतीने खुलासा करावा. शेजवलकरांनी प्रस्तावनेत व आपल्या इतर प्रकरणात महाराजांच्या धाडसाचे, शौर्याचे आणि साध्या, कष्टमय व काटक जीवनाचे यथोचित वर्णन केले असल्याने, 'पालखीतून महाराज आरामाने प्रवास करीत' हा त्यांच्या मदतनिसाने आपल्या कल्पनेतून काढलेला बूट असावासे वाटून, टिकेकरांनी "शिवाजी बहुतेक वेळा पालखीत बसून आरामात प्रवास करी" हीच ज्यांची पक्की समजूत, त्यांनी शिवाजी किती वेळा पालखीत बसून हिंडला याची नोंद कटाक्षाने हुडकून काढली अशी कडक पण गैरलागू टीका माझ्या 'शिवाजी पालखीतून गेल्याचे उल्लेख' या टिपणावर केली आहे. वास्तविक पाहता "शिवाजी नेहमी घोड्यावर बसून दूर जाई ही गोष्ट सर्वदा खरी नाही" हा निष्कर्ष पालखी संबंधीच्या टिपणावरून काढलेला नसून 'शिवाजीच्या आयुष्याच्या कालपटा'वरून काढलेला आहे. पालखीतून जाण्यासंबंधीचे उल्लेख त्यास पूरक म्हणून शेजवलकरांनी काढावयास सांगितले होते.

महाराज ऐषआरामी व जीवास जपणारे हा अर्थ जसा शेजवलकरांस अभिप्रेत नव्हता तसाच, काही इतिहासकार किंवा टीकाकार समजतात त्याप्रमाणे, महाराज घोड्यावरून प्रवास करीत की पालखीतून याचा काथ्याकूटही त्यांना करावयाचा नव्हता. समर्थ रामदास ज्याला 'विवेक' आणि 'सावधपण सर्व-विषयी' म्हणतात त्यावरच महाराजांचे स्वराज्य-स्थापनेचे एकंदर कार्य व त्यांची प्रत्येक कृति कशी अधिष्ठित होती, हे शेजवलकरांना कालपटाद्वारे दाखवावयाचे आहे. महाराजांच्या आयुष्याच्या एकंदर १८३०६ दिवसांपैकी फक्त २०५२ दिवस, उपलब्ध पुराव्याप्रमाणे पाहता, त्यांनी स्वतः लढविण्यात घालविले. यावरून शेजवलकरांनी गणिती पद्धतीने हिशेब केला की, महाराज सदासर्वदा घोड्यावर बसून जात, म्हणजे ते केवळ Actionist होते, हा आतापर्यंत महाराष्ट्रात निर्माण केला गेलेला समज चुकीचा आहे. आयुष्याचे बरेचसे दिवस महाराजांनी स्वस्थतेत (म्हणजे आळसात किंवा आरामात नव्हे!) म्हणजे राज्यहितसंवर्धनाची इतर कार्ये करण्यातच खर्च केले. यावरून महाराज हे केवळ भावनेच्या जोरावर मोठी कार्ये साधू पाहणाऱ्या थोर लोकांच्या (Emotional Actionists) वर्गात मोडणारे नसून, पूर्ण विचारांती प्रत्येक कृति करून स्वतःचे ईप्सित तडीस नेणाऱ्या विचारी महापुरुषांपैकी (Rational Actionists) एक होते, असे शेजवलकरांचे पक्के मत बनले होते. महात्मा गांधी व विसाव्या शतकातील क्रांतिकारक हे Emotional Actionists, तर लो. टिळक हे Rational Actionist असा फरक शेजवलकर करीत. महाराज एकांतिक धाडस करणारे किंवा साधनशुचिता मानणारे नव्हते. विवेकी धाडस व परिस्थित्यनुरूप योग्य साधन वापरण्याची दृष्टी हे त्यांचे स्थायीभाव होते. त्यामुळे महाराज Emotional Actionists पेक्षां Rational Actionists ना अधिक जवळ होते असे शेजवलकर प्रतिपादीत. महाराजांचे स्वराज्यस्थापनेचे ध्येय स्वधर्माविषयींच्या ज्वलंत अभिमानाच्या प्रखर भावनेतूनच प्रस्फुरित झाले ही गोष्ट अगदी खरी. पण एकदा ध्येय निश्चित झाल्यावर ते मूर्त स्वरूपात आणण्यासाठी त्यांनी आखलेली धोरणे व त्याबरहुकूम केलेली प्रत्येक कृति भावनेवर अधिष्ठित नसून विचारावर, सावधपणावर व दूरदृष्टीवर अधिष्ठित होती. अफजलखानाचा वध, शाइस्तेखानावरील हल्ला, सुरतेवरील स्वाऱ्या, कर्नाटकची मोहिम, आग्र्याहून सुटका इत्यादि महाराजांच्या आयुष्यातील ठळक प्रसंग हे भावनांचे उद्रेक नसून एका राजकारण व अर्थकारणपटु धुरंधराने योजनापूर्वक आखलेले आराखडेच होत.

राजा रविवर्म्याच्या चित्रात महाराज सदैव घोड्यावर आरूढ झालेले दाखविले असल्याने व त्यांच्या अश्वारूढ पुतळ्यांमुळे, महाराज केवळ भावनेच्या आहारी जाऊन एकांतिक धाडस करणारे, असा समज फैलावण्यास मदत झाली, असे शेजवलकरांना प्रतिपादन करावयाचे आहे. "घेतला घोडा की ठोकली त्याच्यावर मांड आणि निघाला गडी दौडत गड जिंकावयास" असे, महाराजांना केवळ युद्धाचीच आवड होती हे








दाखविणारे एकांगी चित्र त्यांच्या तसबिरींमुळे व पुतळयामुळे लोकांच्या डोळ्यासमोर निर्माण होते, अशी तक्रार शेजवलकर करीत असत. राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या बौद्धिकात व घोषणातही या अतिरिक्त एकांतिक धाडसाचेच पोषण होते, त्या धाडसामागील वैचारिक स्थिरतेची मूळ बैठक जेवढी घेतली पाहिजे तेवढी लक्षात घेतली जात नाही, हे शेजवलकरांच्या विचाराचे मुख्य सूत्र आहे. म्हणूनच 'ब. मो. पुरंदरे यांचे राष्ट्रीय स्वयंसेवकी विचार,' 'ब, मो. पुरंदरे यांचे शिवाजीच्या धैर्यासंबंधी अतिशयोक्त उद्गार' ही टिपणे काढण्यात आली आहेत.

पालखी व घोडा यासंबंधीचे विवेचन करून आणखीही एक विचार शेजवलकरांना वाचकांच्या मनावर बिंबवावयाचा आहे. घोडा हे गतिमानतेचे किंवा कृतिशीलतेचे, तर पालखी स्थिरतेचे किंवा विवेक दर्शविणारे बाह्य प्रतीक, या दृष्टीने शेजवलकरांनी दोन्हीचा वापर केला आहे. कृतिशीलता व स्थिरबुद्धि यांचा विलक्षण हृदयंगम संगम महाराजांच्या ठायी झाला असल्याने, घोड्यावर लढण्यासाठी केव्हा बसावयाचे, म्हणजे जिवाची तमा न बाळगता संकटात उडी केव्हा टाकावयाची व विश्रांतीसाठी पालखीत केव्हा बसावयाचे, म्हणजे अंग कोणत्या प्रसंगी राखावयाचे याचे तारतम्य त्यांच्या ठायी मोठ्या प्रमाणावर होते. म्हणूनच "त्याने अकारण आपला जीव धोक्यात घालण्याचे टाळलेले दिसते" असे उद्गार शेजवलकरांनी काढले. ससाची शिकार करण्याचा जेथे प्रसंग, तेथे महाराजांसारख्या नरसिंहाने आपले सामर्थ्य खर्च करणे अविचारीपणाचेच ठरले असते. तसली कामे त्यांनी आपल्या सरदारांवर सोपविली. परंतु अफजलखान, शाइस्तेखान यांच्या स्वाऱ्या म्हणजे स्वराज्याच्या जीवनमरणाचे प्रसंग होते. सामान्य व्यक्तीने त्यावेळी संकटात उडी घेऊन चालण्यासारखे नव्हते. तेव्हा महाराजांसारखा लाखांचा पोशिंदा इरेला पडला व संकटसागरात उडी घेऊन स्वराज्याची हेलकावे खात असलेली छोटीशी नाव त्याने पैलतीरास सुखरूप नेऊन पोहोचविली. याउलट स्वराज्याच्या रक्षणाकरिताच स्वतःच्या कुवतीबाहेरचे युद्धप्रसंग महाराजांनी शक्य तो टाळल्याचेच दिसून येते. जंजिरा किल्ला महाराजांच्या दृष्टीने केवढा महत्त्वाचा; पण त्यावर जेवढ्या स्वाऱ्या करण्यात आल्या त्यात महाराजांनी स्वतः भाग एकदा तरी घेतला असल्याचे इतिहासात नमूद नाही. जयसिंगाच्या स्वारीच्या वेळी तर महाराजांनी त्याच्या बलाढ्य सैन्याशी लढण्याचे टाळून अवरंगजेबाशी समेटच केला. यात महाराजांचा भ्याडपणा नसून, स्वतःच्या सामर्थ्याचा अचूक अंदाज व आपल्या जवळील मर्यादित, सैन्य व द्रव्यशक्ति शक्य तो राखून ठेवण्याची दूरदृष्टि, हे उत्तम राज्यकर्त्यांच्या ठायी लागणारे गुणच त्यांच्या अंगी असल्याचे सिद्ध होते. नेमकी हीच गोष्ट "अकारण त्याने आपला जीव धोक्यात घालण्याचे टाळले" या वाक्याने शेजवलकरांस सूचित करावयाची आहे.

या आपल्या विधानास सुसंगत असे उदाहरण त्यांनी 'बसरूरची स्वारी' या प्रकरणात दिले आहे— "सन १६६४ चा पावसाळा संपताच चार नवी गलबते महाराजांनी भटकळ बंदराकडे पाठविल्याचे वृत्त इंग्रजांच्या पत्रात नमूद आहे. या तारवांना ते जमिनीवरून जाऊन मिळणार असा इंग्रजांचा समज होता. पण मार्गात इतक्या खाड्या होत्या की शत्रुप्रदेशातून त्या ओलांडणे महाराजास शक्य नव्हते. अशक्यप्राय गोष्टी अंगावर घेण्याकडे त्यांचा कल नव्हता व आपले सैन्य किरकोळ झटापटीत गमविण्याची त्यांची केव्हाच तयारी नसे." या उताऱ्यातील शेवटचे वाक्य टिकेकरांना खटकले; आणि जे शेजवलकर ग्रंथाच्या पृ. ८३ व ८४ वर "अतर्क्य धाडस ही शिवाजीची कठिण प्रसंगीची कार्यपद्धति होती; तो यशासाठी संधि पाहून अचाट धाडस करी यासारखी विधाने करतात ते परस्परविरोधी अर्थाची वाक्ये कशी लिहितील असे त्यांना वाटून, "अशक्यप्राय गोष्टी अंगावर घेण्याकडे महाराजांचा कल नव्हता" हे विधान माझे असल्याचा सोयिस्कर निष्कर्ष त्यांनी काढला! इंग्रजांच्या किंवा इतर पाश्चिमात्यांच्या आरमारास तोंड देणे १६६४ साली महाराजास 'अशक्यप्रायच' नव्हते काय? मग शेजवलकरांचे विधान चुकले कोठे? चूक शेजवलकरांची किंवा त्यांच्या मदतनिसाची नसून टिकेकरांचीच आहे. शेजवलकरांच्या विधानांचा अर्थ समजावयाचा तर त्यांच्या मागच्या पुढच्या संदर्भात ते काय म्हणतात इतकेच नाही तर सबंध ग्रंथात त्यांना काय सांगावयाचे आहे तेही साकल्याने








लक्षात घ्यावे लागते. 'अशक्यप्राय' शब्दाचा अर्थ बरोबर समजण्यासाठी टिकेकरांनी 'आग्र्याच्या सुटके-नंतर' हे प्रकरण लक्षपूर्वक वाचावे. त्याच्या सुरुवातीलाच शेजवलकरांनी म्हटले आहे, "सन १६६६ साली मिर्झा राजा जयसिंग याच्या मोठ्या स्वारीमुळे निर्माण झालेल्या गंडांतरांतून शिवाजी सहीसलामत सुटून आग्र्याहून परत रायगडास आला व नंतर पाठोपाठ संभाजीही मथुरेहून परत येऊन पोचला. आपले तोकडे सामर्थ्य व अफाट धाडस कोठपर्यंत पोहोचूं शकतात याचा त्यास उत्तम अंदाज आला. अनेक शत्रुंशी एकदम लढणे अशक्य आहे असे निश्चित समजून त्याने बलाढ्य मोगल बादशाहीशी, काही वर्षें (१६६७-६९), कमीपणा स्वीकारूनही सख्य राखण्याचे ठरविले." या उतान्याच्या शेवटच्या वाक्यातील 'अशक्य' शब्दाकडे टिकेकरांनी मुद्दाम लक्ष द्यावे. 'अतर्क्य धाडस' व 'अशक्यप्राय गोष्ट' यांच्या सीमारेषा अचूक ओळखणे हाच महाराजांच्या स्वभावाचा मोठा पैलू होता. "शिवाजीस इष्ट काय हे जसे समजत होते तसेच शक्य काय हे त्याहून अधिक कळत होते." त्यामुळेच तर कधी साम, तर कधी दंड व भेद या मार्गाने ते यशस्वी स्वराज्य-संस्थापक होऊ शकले.

शेजवलकरांची ही वैचारिक भूमिका नीट न समजल्यानेच "महाराजांच्या धैर्याचे श्री. ब. मो. पुरंदरे यांनी केलेले अतिशयोक्त वर्णन टिपणकाराच्या नजरेत का भरले याचा विचार केला पाहिजे," असे टिकेकरांस वाटले. इस्लामी सत्तांच्या व परकीयांच्या झंझावातास तोंड देऊन स्वराज्य स्थापणाऱ्या छत्रपतींचे धैर्य खडकाप्रमाणे अचल होते याबद्दल कोणालाच शंका नाही. पण श्री. ब. मो. पुरंदरे यांनी ज्या अशास्त्रीय पद्धतीने त्याची वारेमाप स्तुति केली आहे त्या पद्धतीविरुद्ध शेजवलकरांचा रोख होता. खुद्द टिकेकरांचेच या बाबतीत उदाहरण देता येईल. त्यांनी आपल्या परीक्षणात म्हटले आहे, "महाराजांच्या धैर्याचे वर्णनच करता यावयाचे नाही. अफजलखानाशी एकटा भेटीस जाण्यात धैर्याची कमाल झाली." महाराजांच्या धैर्याचे वर्णनच करता यावयाचे नाही म्हणावयाचे तर मग खानाच्याही धैर्याचे वर्णन करावयास नको काय? शरीरसामर्थ्याच्या बाबतीत स्वतः-पेक्षा वरचढ असलेल्या खानाला एकांती भेटण्यास महाराज गेले म्हणून त्यांची जशी धीटपणाबद्दल पाठ थोपटली पाहिजे त्याप्रमाणेच खान धोका पत्करून (कारण भेटीचे स्थळ व दोन्ही बाजूंची सैन्यव्यवस्था महाराजास अनुकूल व खानास प्रतिकूल होती) शत्रूच्या गोटात त्याला भेटण्यास गेला याबद्दल त्याचेही कौतुकच करावे लागेल. नुसत्या धैर्याच्या दृष्टीने पाहिल्यास खान महाराजापेक्षा मुळीच कमी नव्हता. तो कमी पडला मुत्सद्देगिरी, सावधपणा, चतुरस्रता, विवेक व नैतिक सामर्थ्य यात. याच गुणांच्या जोरावर खानाच्या कुटिल नीतीचा फासा बरोबर त्याच्यावरच उलटवून महाराज विजयी झाले. हे लक्षात घेता "महाराजांच्या धैर्याचे वर्णनच करता यावयाचे नाही," "त्यांच्या धैर्याला जगांत तोड नाही" वगैरे केली जाणारी भरमसाट विधाने अतिशयोक्तच म्हटली पाहिजेत.

स्वराज्यस्थापनेचे ध्येय प्रत्यक्षात आणताना महाराज अखंड सावधान असून त्यांच्या अंगी राजकीय द्रष्टयाची दूरदृष्टि कशी वसत होती हे सिद्ध करण्यासाठी शेजवलकरांनी महाराजांच्या आयुष्यपटासंबंधी म्हणून ठेवले आहे की, "महाराजांच्या आयुष्याचा फक्त $\frac{१}{७}$ भाग त्यानी स्वतः युद्ध करण्यात घालवला; म्हणजेच शिवाजीच्या पुष्कळशा स्वाऱ्यातील यश त्यांच्या सरदारांनी मिळविल्याचे ठरते." या वाक्यास उद्देशून टिकेकर म्हणतात की त्यावरून गैरसमज फैलावण्याचा संभव आहे. महाराज स्वतः लढाईवर जाण्याचे शक्य तो टाळून स्वतःच्या सरदारांकरवी युद्धे लढवीत आणि त्या सरदारांच्या पराक्रमामुळेच स्वराज्य स्थापन झाले, असा अर्थ बहुधा त्यांनी लावला असावासे वाटते. शेजवलकरांना हा अर्थ मुळीच अभिप्रेत नव्हता. महाराज शूर व धाडसी वीर कसे होते हे त्यानी आपल्या प्रस्तावनेतच, कार्लाईलच्या 'वीर व वीरपूजा या ग्रंथामधील वीरपुरुषाच्या व्याख्येस अनुसरून सुस्पष्ट रीतीने दाखविले आहे. उपलब्ध ऐतिहासिक पुराव्यात महाराजांच्या नावावर जेवढ्या स्वाऱ्या उल्लेखिल्या जातात, तेवढ्या सर्वांचे श्रेय शेजवलकरांनी महाराजांना त्यांच्या आयुष्यपटात पूर्णपणे दिलेले आहे. त्यातील कोणत्याही दोन तीन स्वाऱ्यादेखील महाराजांचे शौर्य व धाडसीपणा सिद्ध





अनुक्रमणिका

करण्यास पुरेशा आहेत. पण महाराजांचा मोठेपणा केवळ रणकौशल्यात नव्हता. अनेक शूर वीर व सेनापति त्यांच्या पूर्वी, नंतर व त्यांच्याच काळातही हिंदुस्थानात होऊन गेले. महाराजांचा मोठेपणा एक स्वतंत्र राष्ट्र ( राज्य या अर्थाने ) निर्माण करून ते आपल्या पश्चातही चालू रहावे याबद्दलची दूरदृष्टीने तजवीज करून ठेवण्यात आहे. " मराठी राज्याच्या अभिमानाचा रुजवून काढलेला माणसांचा ताटवा हीच शिवाजीची अद्वितीय, चिरस्मरणीय व महाराष्ट्रीय लोकांस आजवर पुरलेली व उपयोगास येणारी कामगिरी होय " या अगदी यथार्थ शब्दात शेजवलकरांनी महाराजांच्या थोरवीचे मर्म समजावून दिले आहे. आपण स्थापिलेले राज्ययंत्र सुरळीतपणे कायम चालण्यासाठी आपल्या पश्चात् राज्याची धुरा स्वतंत्रपणे वाहू शकणारी माणसे तयार करणे महाराजांना भागच होते. त्यासाठी राज्यकारभाराची जबाबदारी जशी त्यांनी अनेक मुलकी अधिकाऱ्यांच्या शिरावर टाकली तशीच लष्करी जबाबदारीही अनेक सरदारांवर सोपविली. महाराजांच्या आयुष्यपटात फक्त त्यांनी मारलेल्याच स्वाऱ्या दिलेल्या आहेत. त्यांच्या सरदारांनी मारलेल्या लढायांचाही स्वतंत्र पट तयार केला तर महाराजांनी स्वतः मारलेल्या लढायांइतकीच जवळ जवळ त्यांची संख्या भरेल. म्हणून 'पुष्कळशा' लढाया सरदारांनी मारलेल्या आहेत, असे विधान शेजवलकरांनी केले आहे. सूर्यापुढे जसा काजवा त्याप्रमाणेच अलौकिक व्यक्तिमत्त्वाच्या महाराजांच्या अलौकिक यशापुढे त्यांच्या सरदारांचा पराक्रम दृष्टीआड होण्याचा काहीसा संभव आहे. तसे होऊ नये हा शेजवलकरांच्या विधानामागील हेतु आहे.

[ महाराजांसंबंधीचा सध्या उपलब्ध असलेला पुरावा मर्यादित आहे. त्याच्या चौकटीतच शेजवलकरांनी हा सिद्धांत मांडला आहे. उद्या अधिक तपशीलवार पुरावा मिळाला व महाराजांनी आणखी लढाया मारल्याचे सिद्ध झाले किंवा सरदारांनी मारलेल्या काही लढाया महाराजांच्या आधिपत्याखाली झालेल्या होत्या असे ठरल्यास शेजवलकरांचे विधान मागे घ्यावे लागेल. ]

महाराजांनी आपल्या सरदारांवर विश्वास टाकला व सरदारांनी तो सार्थ करून दाखविला (आग्रागमनाच्या व कर्नाटकच्या स्वारीच्या वेळी, तसेच महाराजांच्या निधनानंतर ) हे त्यांस दूषण नसून भूषणच आहे.

'शिवाजी राजकीय आघाडीवर जिंकला पण कौटुंबिक आघाडीवर पराभव पावला " हे माझे मत असल्याचे टिकेकर ठोकून देतात, पण वाक्यापुढे प्रश्नचिन्ह आहे हे विसरतात! १९६२ साली, नवरात्रोत्सवाच्या निमित्ताने पुण्याच्या याज्ञवल्क्याश्रमात महाराजांच्या चरित्रावर एक व्याख्यानमाला गुंफण्यात आली होती. तीत एका थोर विचारवंताने हे मत प्रतिपादिले होते. त्याचा केवळ चर्चेसाठी म्हणूनच आराखड्यात उल्लेख केला आहे. शेजवलकरांनी याबाबत कोणताही निर्णय घेतलेला नव्हता.

'शिवाजीची जगातील थोर पुरुषांशी तुलना करणे चूक' हा माझा अपरिपक्व सिद्धांत असल्याचे टिकेकर सांगतात तेही खरे नाही. जर तो माझा सिद्धांत असता तर तो दिल्यानंतर लगेच मी महाराज व पंडित नेहरू यांची तुलना केली आहे ती केली नसती. तिच्याकडे टिकेकरांनी सोयिस्कररीत्या दुर्लक्ष केले आहे. [ दुर्दैवाने विधानापुढील प्रश्नचिन्हही मुद्राराक्षसाच्या चुकीमुळे गाळले गेले आहे. ] जगातील महापुरुषांची एकमेकांशी तुलना करून त्यात सरस नीरस ठरविणे कितपत योग्य; व तसे करावयाचे झाल्यास त्यांतील अडचणी कोणत्या वगैरे इतिहासशास्त्रातील एका महत्त्वाच्या प्रश्नाबाबत शेजवलकरांना चर्चा करावयाची होती. महाराजांच्या कार्याचे मूल्यमापन करताना, प्राचीन व अर्वाचीन काळात होऊन गेलेल्या अनेक देशी, विदेशी महापुरुषांशी त्यांची तुलना केली जाते. या बाबतीत शेजवलकरांचे मत मराठ्यांच्या इतिहासाचे एक थोर संशोधक श्री. दि. वि. काळे यांच्या पुढील मताशी जुळले होते- ( " स्वराज्य स्थापून हिंदुमात्राला स्वतंत्र आश्रयस्थान महाराजांनी निर्माण केल्यामुळे ) पारतंत्र्याच्या कोंडीत सापडलेल्या भारतीयांनी शिवाजीमहाराजांना स्वराज्यसंस्थापक, उत्तम सेनापति, मुत्सद्दी आणि राष्ट्राचा निर्माता अशा सर्वोत्कृष्ट पदव्या बहाल केल्या. आणि साहजिकच या कोटीतील अकबर, शिकंदर, नेपोलियन, शार्लमेन, वेलिंग्टन, चर्चिल, हिटलर, हॅनिबाल अशा या पृथ्वीवरील मोठ्या माणसांशी त्यांची तुलना करून त्यांना त्यांच्या मानाने लहान किंवा मोठे ठरविण्याचा प्रयत्न केला. अशी तुलना








करावयाची तर समकालीन परिस्थिती आणि तिजवर मात करण्याची उपलब्ध असलेली साधने यांची योग्य दखल घ्यावयास पाहिजे. तशी काळजी घेतली तर शिवाजी महाराज निःसंशय कमी पडणार नाहीत. परंतु पाश्चात्यांबद्दल जितकी तपशीलवार माहिती मिळते तितकी आपल्या शिवाजीमहाराजांबद्दल मुळीच मिळत नाही, याचाही विचार अवश्य झाला पाहिजे. " ( छत्रपति शिवाजी महाराज, आ. १ ली, पृ. २४०-४१ ). काही विशिष्ट गोष्टीबाबत दोन व्यक्तींची तुलना करून त्यातील साम्य व विरोध दाखविण्यास शेजवलकरांची मुळीच हरकत नव्हती. त्या दृष्टीने गांधी, नेहरू वगैरे पुढाऱ्यांशीही त्यानी महाराजांची तुलना ग्रंथात केलेली आहे. पण जागतिक दृष्टिकोनातून महाराजांचे निश्चित स्थान ठरवायचे झाल्यास महापुरुषाची व्याख्या आणि काल व परिस्थिति यांचा ' मानदंड ' ठरविला पाहिजे, असे त्यांचे स्पष्ट मत होते.

मी शिवचरित्रग्रंथाच्या आराखड्यात ' शिवाजीचे हत्तीदल व तोफखाना कमी कां ? ' हा चर्चेस घेतलेला मुद्दा अनावश्यक असल्याचे टिकेकरांचे मत आहे. ते त्यानी पुढीलप्रमाणे मांडले आहे— " शिवाजीचे हत्तीदल कमी का हा प्रश्नच विचारू नये. कारण महाराष्ट्रांतील भूमि हत्तीच्या हालचालींना सोयीची नाही. जेथे माणसे मूठभर हुरडा खाऊन रहातात तेथे हत्ती पोसण्याची जबाबदारी पत्करील कोण ? शिवाय " गनिमी आमुचा बाणा " शिवकाली निश्चित होता. त्या युद्धपद्धतीस हत्ती सोयीचे कसे ? म्हणून वाटते की असे प्रश्न विचारणाराला शिवचरित्राचे, शिवकालाचे " ग्यान " झालेले दिसत नाही ! तीच गोष्ट तोफखान्याची ! तोफखाना म्हणजे काही परसात लावावयाची भाजी नव्हे. खेचरे-घोडी, गोलंदाज, दारू बनविण्याचे कारखाने, गोळे तयार करणारी मंडळी शिकून तयार व्हावी लागतात. खुद्द पेशवाईतदेखील तोफखान्याबाबत किती अडचणी होत्या याची कल्पना हा प्रश्न विचारणारास दिसत नाही. " गंमत अशी की टिकेकरांच्या या कारण मीमांसेतच हत्तीदल व तोफखाना यांची चर्चा का केली पाहिजे याचे उत्तर आले आहे. इतिहासशास्त्राची व्याख्या निरनिराळया इतिहासकारांनी वेगवेगळया प्रकारे केली आहे. एकजण म्हणतो " History is geography set in motion " तर " Society and Politics are the root of which History is the fruit " असे दुसऱ्याचे मत आहे. कार्ल मार्क्सने तर, आर्थिक घटक हा इतिहासप्रवाहाला वळण देणारा मुख्य व एकमेव नसला तरी निर्णायक घटक मानला आहे. म्हणजे भूगोल तसेच आर्थिक, सामाजिक व राजकीय स्थिती, ही कोणत्याही कालखंडाच्या इतिहासाची प्रमुख अंगे ठरतात. त्यामुळे शिवकालीन इतिहासवृक्षाच्या या मूळ बीजांकडे मुळीच दुर्लक्ष करता येणार नाही. हत्तीदल व तोफखाना ही मध्ययुगीन सैन्यदलाची महत्त्वाची अंगे होती. सैन्यदलाच्या कोणत्याही एका अंगात उणीव राहिल्यास तिचे राजकीय दृष्टीने अनिष्ट असे दूरगामी परिणाम घडून आल्याची उदाहरणे इतिहासात किती तरी देता येतील. पेशवाईच्या ऱ्हासाच्या अनेक कारणापैकी तोफखान्यातील मागासलेपणा हेही एक प्रमुख कारण आहे. शिवाजीमहाराजांपासून पेशव्यांपर्यंत, अनेक अडचणीमुळे मराठे तोफखान्याच्या बाबतीत मागे होते असे टिकेकर सांगतात. पण पेशव्यांचेच समकालीन निजाम, गाडदी व इतर मुसलमान हे मात्र तोफखान्याच्या बाबतीत पेशव्यांपेक्षा वरचढ होते. या गोष्टीची कारणे शोधून काढून त्यांची चर्चा इतिहासकाराने करावयाची नाही तर मग करावयाची तरी कोणी ? महाराष्ट्राची भौगोलिक रचना व मराठ्यांचा म्हणजेच पर्यायाने हिंदूंचा आर्थिक व भौतिक शास्त्रातील मागासलेपणा यामुळे शिवकालात तोफखान्याची उणीव कशी होती हे दाखविण्यासाठीच तर तोफखान्याची चर्चा पाहिजे. ज्या गनिमी काव्यामुळे शिवकालांत तोफखाना व हत्ती यांची गरज नव्हती असे टिकेकर सांगतात, तो गनिमी कावा कर्नाटकाच्या स्वारीत सोडून देऊन महाराजांना कुतुबशहाचा तोफखाना मदतीस घ्यावा लागला, ही गोष्ट टिकेकर कशी विसरतात ? महाराजांच्या सैन्याकडे तोफखाना नसल्यामुळे वेलोरचा किल्ला अब्दुल्लाखानाने चौदा महिने लढविला, त्याचप्रमाणे त्यांच्या सैन्याच्या एका तुकडीला बेलवाडीच्या एका यःकश्चित् देसाइणीने आपल्या गढीच्या साहाय्याने महिनाभर झुलविले, या व अशा तऱ्हेच्या प्रसंगांकडे टिकेकर कोणत्या दृष्टीने पाहू म्हणतात ? 'जशी संस्कृति तसे







हत्यार' हे राजवाड्यांनीच आपल्या विवेचनात दाखविले आहे. महाराजांना किंवा कोणाही व्यक्तीला दोष देण्यासाठी नव्हे, तर शिवकालाची संस्कृति यथार्थ रीतीने समजून घेण्यासाठी हत्तीदल व तोफखाना यांची चर्चा अवश्य आहे.

शेजवलकरांचे ऐतिहासिक सिद्धांत व दृष्टी यांची पार्श्वभूमी त्यांच्या शिवचरित्रग्रंथांचे परीक्षण करताना टिकेकरांनी लक्षात घेतली हे योग्यच झाले. पण शेजवलकरांच्या स्वभावावरून त्यांच्या ग्रंथाचे परीक्षण करण्याची त्यांची भूमिका मात्र अशास्त्रीय आहे. 'इतिहासकार कसा राहे फिरे हे पाहिले पाहिजे' हे टिकेकरांनी कार या इतिहासकाराचे उद्धृत केलेले विधान पूर्ण सत्य नसून सत्याचा केवळ अंश आहे. इतिहासकाराची सुस्थिति त्याच्या इतिहासलेखनास पोषक होईल हे खरे. पण खरी ऐतिहासिक दृष्टि व इतिहासासंबंधीची तळमळ ही काही आर्थिक स्वास्थ्यावर अवलंबून नाहीत. कै. राजवाडे, कै. दत्तोपंत आपटे हे संशोधक आर्थिक सुस्थिति नसताही प्रचंड कार्य करून गेले. भारत इतिहास संशोधक मंडळाचे इतिहाससंशोधनातील महत्त्वाचे कार्यही आर्थिक मदत फारशी नसतानाच झाले आहे. सरकारी नोकराला स्वातंत्र्याचे खरे रहस्य कळणार नाही असे टिकेकर म्हणतात. पण मराठ्यांच्या इतिहासातील स्वातंत्र्याचे रहस्य उकलून दाखविणारे कै. महादेव गोविंद रानडे हे सरकारी नोकरी करणारेच होते हे टिकेकरांनी ध्यानी घ्यावे. याचा अर्थ टिकेकरांची विधाने पूर्णपणे चुकली असा नसून, त्यांनाही दुसरी बाजू आहे, एवढेच त्यांच्या लक्षात आणून द्यावयाचे आहे. ग्रंथकाराचा स्वभाव हा काही खरा ऐतिहासिक निकष नव्हे. पण टिकेकरांनी तसा तो धरल्याने शेजवलकरांवर एके ठिकाणी त्यांनी अन्याय केला आहे. शेजवलकर स्वजन–तेजोभंग करतात हे टिकेकरांचे आवडते मत. त्यास अनुसरून यांनी शेजवलकरांसंबंधी म्हटले आहे की, "सतराव्या शतकातील हिंदुस्थान" या प्रकरणात पोर्तुगीज–गुण– वर्णन व स्वजन– तेजोभंग बराच आहे. हे सबंध प्रकरण फक्त चार पृष्ठांचे असून त्यात पोर्तुगिजांचा उल्लेख पृ. १०३ व १०४ वर असा दोनदा आला आहे. पृ. १०३ वर पोर्तुगीज ख्रिस्ती धर्मप्रसारक एतद्देशीय लोकांना कसे बाटवीत याची हकीकत असून, टिकेकर ज्याला पोर्तुगीज–गुण-वर्णन म्हणतात तो भाग पृ. १०४ वर आला आहे—"मात्र दक्षिणच्या राजकारणात पोर्तुगिजांचा हात कोठे ना कोठे काही प्रमाणात इंग्रजांच्या राज्यस्थापनेपर्यंत सर्वत्र राहिला. सबंध मराठेशाही, शाहजीपासून आरंभ करून, व त्यापुढील पेशवाई, पोर्तुगिजांची मदत केव्हा ना केव्हा मागताना इतिहासात आढळून येते व त्यांच्या ढवळाढवळीचा मराठ्यांच्या इतिहासावर कायम ठसा उमटलेला आहे. मलीक अंबर व शाहजी, तसेच शिवाजी-संभाजी यांच्या कारकिर्दीवर पोर्तुगिजांच्या इतिहासाचा चांगलाच परिणाम घडून आला आहे. पोर्तुगीज पत्रातील व अहवालातील उल्लेखावरून दक्षिणचा इतिहास जुळविण्यात मोठी मदत होते. पोर्तुगिजात वर्णद्वेश युरोपातील दुसऱ्या राष्ट्रापेक्षा सर्वांत कमी होता. याचाही फायदा आफ्रिका, आशिया व दक्षिण अमेरिका येथील प्रदेशात त्यांना घेता आला." बहुधा शेवटची दोन वाक्ये टिकेकरांस खटकली असावीत. याचे कारण 'धर्मद्वेष' व 'वर्णद्वेष' यात त्यांनी केलेली गल्लत होय. पोतुगीज धर्मद्वेष्टे होते. हिंदूंना बाटविण्यासाठी त्यांनी खूप अत्याचारही केले. पण वर्णश्रेष्ठत्वाचा गंड त्यांच्या ठिकाणी कमी असल्याने एतद्देशीय हिंदूंशी लग्ने करून त्यांचे आचार-विचार काही अंशी उचलण्यास त्यांनी मागे पुढे पाहिले नाही. या उलट इंग्रज धर्मद्वेष्टे उघडपणे नसूनही वर्णश्रेष्ठत्वाच्या गंडामुळे हिंदूंपासून आपली संस्कृति त्यांनी अलिप्तच ठेवली. वरील संबंध उताऱ्यात अवास्तव पोर्तुगीज–गुण–वर्णन आले आहे काय किंवा शेजवलकरांनी बुद्धिपुरस्सर स्वजन-तेजोभंग केला आहे किंवा काय ते वाचकानीच ठरवावे ! इतिहासकाराचा स्वभाव ग्रंथात ओढल्याचा हा दुष्परिणाम, दुसरे काय ?

परकीयाच्या रेकॉर्डासंबंधी शेजवलकरांनी घेतलेली भूमिका पूर्णपणे लक्षात न आल्याने, "शेजवलकरांच्या या ग्रंथात इंग्रजी, डच व फ्रेंच रेकॉर्डाची नीट छाननी न करता त्यांतील गप्पांवर अंधविश्वास ठेवण्यात आलेला आहे." अशी टीका टिकेकरांनी केली आहे. या बाबतीत फ्रेंच प्रवासी बॅरॉं याचे उदाहरण घेऊन त्यांनी पुढील विवेचन केले आहे : "१६७७ च्या कर्नाटकस्वारीचा बेत बॅरॉंला पावणेदोन वर्षे आधी, म्हणजे ऑगस्ट १६७५ त समजू देण्याइतके ढिले व्यवहार आमच्या शिवप्रभूंचे

होते असे कसे मानावे ? खुद्द शेजवलकरांनीच पृ. १६३ वर म्हटले की, जिंजीकडे जाण्याचा शिवाजीचा हेतु १६७५ च्या अखेरीपर्यंत तरी नव्हता!! तरी ब्रिटिश रेकॉर्डातील बातमी खरी मानण्याकडे त्याचा (मदतनीसाचा) कल आहे!" म्हणजे इतर अनेक विधानाप्रमाणे हेही मदतनीसाचे मत मध्येच दडपले गेले आहे असे टिकेकरांना सुचवावयाचे आहे! तरी बरे, खुद्द शेजवलकरांनी त्याच पृष्ठावर म्हणून ठेवले आहे की, "शिवाजीच्या मनात पूर्व कर्नाटकावर स्वारी करावयाची आहे असे बॅरॉं या फ्रेंच अधिकाऱ्यास १६७५ पूर्वीच कळले होते !" शेजवलकरांनी पुढे आणखीही स्पष्ट केले आहे की, "बॅरॉं म्हणतो त्याप्रमाणे शिवाजी स्वतः त्या प्रदेशाची स्वारी करणार नसून, व्यंकोजीकडून त्याला ती करावयाची होती. बॅरॉंला त्याच्या राजकारणातील बारकावा समजला नाही." शेजवलकरांना काय सांगावयाचे आहे ते पुरते लक्षात न घेता त्यांचे मधलेच एक वाक्य घेऊन केवळ ते टिपणात आले म्हणून त्यांच्या मदतनिसांच्या माथी मारणे हे जबाबदार टीकाकारास शोभणारे नाही. टिपणातील जो भाग ग्रंथात आलेला आहे तो शेजवलकरांनी आपल्या चिकित्सेच्या चाळणीतून चाळून घेऊन मगच ग्राह्य ठरविलेला आहे हे टिकेकरांनी ध्यानात घ्यावे. बॅरॉंच्या कानावर आलेली माहिती खरीखोटी ठरविण्याची टिकेकरांची पद्धत पूर्णपणे अशास्त्रीय आहे. महाराजांचा एकही बेत बाहेर फुटणेच अशक्य हे गृहीत धरून ते पत्राची विश्वसनीयता ठरवू पाहतात. महाराज आपला प्रत्येक बेत दक्षतेने व गुप्तपणे आखीत असले पाहिजेत हे खरे. पण म्हणून काय त्यांची एकही गोष्ट बाहेर समजत नव्हती असे थोडेच आहे ? महाराज कितीही अलौकिक असले तरी शेवटी मानवच होते. त्यांच्या एखाद्या अधिकाऱ्याकडून गौप्यस्फोट होण्याचा संभवच नव्हता असेही नाही. महाराजांनी अत्यंत गुप्तता राखलेली असूनही त्यांचे बेत काही वेळा कसे फुटत हे शिवचरित्रग्रंथांतच 'बसरूरची स्वारी' या प्रकरणात शेजवलकरांनी दाखवून दिले आहे. या स्वारीच्या वेळी महाराजांना कारवारची इंग्रजांची फॅक्टरी लुटावयाची होती. पण त्यांचा गुप्त बेत इंग्रजांना आधीच कळून त्यांचा डाव हुकला. (पृ. ११७). सन १६६६त महाराजांनी आदिलशहाच्या ताब्यातील पन्हाळगडावर अचानक धाड घातली असताही तेथील शिबंदी ऐनवेळी लढाईच्या तयारीत दिसून आली व गड घेण्यात महाराजास अपयश आले ते कशामुळे ? शिवकालात दळणवळणाच्या साधनांच्या अभावामुळे अनेक बाजारगप्पा उठत व त्यांची पाश्चिमात्यांच्या रेकॉर्डात नोंद होई हे खरे.. पण काही वेळा त्या बाजारगप्पात सत्याचा अंशही असे. बॅरॉंच्या बातमीत पूर्ण सत्य नसले तरी सत्यांश होताच. महाराज कर्नाटकावर स्वारी करणार ही त्याची बातमी चुकीची असली तरी कर्नाटकबद्दलची काही तरी मसलत महाराजांच्या दरबारी घाटत होती ही वस्तुस्थिती होती. फॅक्टरी रेकॉर्डस् म्हणजे निव्वळ बाजारगप्पा हे सिद्ध करण्यासाठी टिकेकरांनी, '१६७६त उठलेल्या महाराजांच्या मृत्यूसंबंधीच्या अफवा' हे टिपण उदाहरण म्हणून दिले आहे. पण या अफवांमागेही 'सत्यांश' होता ही गोष्ट ते विसरतात. महाराज त्यावेळी भयंकर आजारी असून त्यांचा मृत्यु होण्याचीही शक्यता होती. या आजाराची बातमी गुप्त ठेवण्याचा प्रयत्न निश्चित झाला असणार. तरी देखील परकीयांच्या कानी ती कशी आली ? संभाजीच्या चारित्र्याविषयीचा प्रवादही इंग्रजांच्या कानी याच वेळी कसा आला ? या दोन्ही बाबतीत पराचा कावळा झालेला असेल; पण मुळात 'पर' होते हे निश्चित. परकीयांच्या बातम्यावर अंधविश्वास ठेवणे जसे गैर तसेच त्यांची प्रत्येक बातमी बाजारगप्पही समजणे चूकच.

म्हणून या बाबतीत कोणता तरी निश्चित दंडक ठरविणे आवश्यक ठरते. शेजवलकरांच्या कसोट्या पुढीलप्रमाणे होत्या— (१) माहिती देणाऱ्याचा दर्जा व ज्ञानाची उंची पारखून घेणे (२) माहितीचे साधन प्रत्यक्ष की अप्रत्यक्ष याचा मागोवा घेणे (३) माहितीला इतर साधनात आधार आहेत किंवा काय हे पाहणे (४) माहिती देणारा ज्याचे वर्णन करतो त्यात त्याचे हितसंबंध कितपत गुंतले आहेत याची दखल घेणे (५) परकीयांचे प्रत्येक मत पारखून घेणे. त्यानी निरपेक्षपणे दिलेल्या घटना, वर्णने, तारखा या मात्र सत्याच्या पुष्कळ जवळ असतात. (६) स्थळवर्णने भूगोलदृष्ट्या तपासून घेतली पाहिजेत.










महाराजांचे कर्नाटकातील मुक्काम शेजवलकरांनी इंग्रजांच्या व फ्रेंचांच्या माहितीवर आधारल्याबद्दल टिकेकरानी आक्षेप घेतला आहे. या बाबतीत एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की इंग्रजांचे व फ्रेंचांचे हेर महाराजांच्या सैन्याच्या मुक्कामापासून फार लांब नसत. कारण महाराजांची धाड आपल्या प्रदेशावर केव्हा येईल याचा नेम नाही असे वाटून अत्यंत जागरूकतेने महाराजांच्या सैन्याच्या पाळतीवर राहून त्याशी लाडीगोडी साधण्याच्या प्रयत्नात ते असत. त्यामुळे महाराजांचे मुक्काम व त्यांचे काल, त्याचप्रमाणे त्यानी ( परकीयांनी ) उल्लेखिलेले प्रसंग पुष्कळसे खरे समजण्यास प्रत्यवाय नाही. त्यांची वर्णने व मते मात्र पूर्णपणे तपासून घेतली पाहिजेत. शेजवलकरांनी परकीयांचे सर्वच उल्लेख ग्राह्य ठरविलेले नाहीत. श्रीरंगपट्टण लुटल्याचा उल्लेख इंग्रजांच्या पत्रात दोन तीनदा येऊनही त्यानी नकाशाच्या आधारे अग्राह्य ठरविला. तीच गोष्ट तिम्मेरीची वखार लुटल्याबाबतची. इतरही पुष्कळशा ठिकाणांचे उल्लेख त्यांनी अविश्वसनीय मानल्याचे ‘ शिवाजी महाराजांच्या आयुष्याचा कालपट ठरविण्यास आधारभूत असे ऐतिहासिक साधनातील उल्लेख ’ हे टिपण बारकाईने वाचल्यास आढळून येईल. त्यांनी शिवचरित्रग्रंथाच्या १७४, १७५, १७८, १७९, १८१, १८३, १८४, १८८, १८९, १९२–९४, १९६–९७ पृष्ठांवर इंग्रज, फ्रेंचादी पाश्चिमात्यांवर प्रखर टीका करून, त्यांच्या अनेक विधानातील अतिशयोक्ति, हिंदूंविरुद्धचा पक्षपातीपणा व फोलपणा उघडकीस आणला आहे. इंग्रजांनी महाराजांची अलेक्झांडर, हॅनिबाल इत्यादींशी तुलना करून त्यावर उधळलेली स्तुतिसुमनेही शेजवलकरांनी, योग्य पुराव्याच्या अभावी ग्राह्य मानलेली नाहीत. इतके सर्व असूनही टिकेकर मात्र म्हणतात की शेजवलकरांनी पाश्चिमात्यांच्या रेकॉर्डांवर अंधविश्वास ठेवला !

‘ दक्षिण–दिग्विजय ’ हे प्रकरण सजविण्यासाठी शेजवलकरांनी, कै. शां. वि. आवळसकर यांनी संपादिलेले शिवाजी–व्यंकोजी संबंधाबाबतचे पत्र ग्राह्य धरले, याशीही टिकेकर सहमत नाहीत. पुढील कारणांसाठी ते पत्र त्यांस अग्राह्य वाटते— ( १ ) पत्र अस्सल नाही ( २ ) “ दहावीस हजार होन घेऊन देऊन भेटीजवळ करावा आणि पछाडून कापून टाकावा” असे छत्रपति उघडपणे आपल्या भावास लिहितील हे खरे वाटत नाही. ( ३ ) महाराजांनी महाराष्ट्रातील स्वतःच्या जहागिरीबाबत चकार शब्द न काढता व्यंकोजीस त्याच्या जहागिरीतील वाटा देण्यास सांगितले असेल हे चूक वाटते ( ४ ) सर यदुनाथ सरकार व श्री. शं. ना. जोशी यांनी स्वतंत्र विचाराने शिवाजी–व्यकोजीसंबंधाची सर्वच पत्रे अविश्वसनीय ठरविली आहेत.

टिकेकर सांगतात त्याप्रमाणे आवळसकरसंपादित पत्र अस्सल नाही हे खरे. पण म्हणून तेवढ्यासाठी ते नाकारले पाहिजे असे नाही. कोर्टात ज्याप्रमाणे प्रत्यक्ष पुरावा नसल्यास काही विशिष्ट प्रसंगी परिस्थितिजन्य पुरावा ( Circumstantial evidence ) ग्राह्य धरतात, त्याचप्रमाणे एखादे पत्र अस्सल नसूनही भाषा, मांडणी व अंतर्गत पुरावा इत्यादि दृष्टीनी अस्सलबरहुकूम नकल वाटत असेल तर इतिहासकार ते पत्र ग्राह्य धरू शकतो. शेजवलकरांनी आवळसकरसंपादित पत्र या अपवादात्मक कोटीतील धरूनच ग्राह्य मानले आहे, आंधळेपणाने नव्हे. पत्र अंतर्गत पुराव्याच्या दृष्टीने कसे भक्कम आहे हे त्यांनी ‘ दक्षिण–दिग्विजय ’ प्रकरणाच्या सुरुवातीसच स्पष्ट केले आहे. पत्रातील भाषा महाराजांची वाटते व नकलही शिवकाळातील असली पाहिजे. शेजवलकरांच्या मतास कै. इतिहासाचार्य राजवाडे यांच्याच नियमाचा आधार आहे— “ समकालीन व्यक्तींनी समकालीन प्रसंग साक्षात् घडत असताना परमार्थाने लिहिलेले किंवा लिहविलेले अस्सल पत्र किंवा त्याची नक्कल सर्वांशी जातीने प्रमाण होय. ” [ राज. खंड ४, पृ. ४९ ]

टिकेकरांच्या दुसऱ्या आक्षेपाबाबत उत्तर देता येईल की महाराजांनी व्यंकोजीला ज्यावेळी पत्र लिहिले त्यावेळी ते गुप्त पत्र म्हणूनच लिहिले असणार व व्यंकोजीनेही हयात असेपर्यंत ते पत्र गुप्तच राखले असले पाहिजे. व्यंकोजीच्या पश्चात् त्याच्या वंशजांपैकी कोणीतरी त्याची नकल करवून घेतली असेल किंवा कोणाच्या तरी हातात पडून, ते महत्त्वाचे राजकारणी पत्र म्हणून त्याची नकल होऊन ते जपून ठेवले गेले असेल. आज आपल्याला ते उघड लिहिल्यासारखे वाटते म्हणून महाराजांनी ते उघडपणे लिहिले हे म्हणणे चूक.








महाराजांनी महाराष्ट्रातील स्वतःच्या जहागिरीबद्दल चकार शब्द न काढता व्यंकोजीस त्याच्या जहागिरीतील वाटा देण्यास सांगितले असेल हे टिकेकरास पटत नाही. शिवाजी-व्यंकोजीसंबंधाची पत्रे ज्यांनी अविश्वनीय ठरविल्याचे टिकेकर सांगतात त्या कै. शं. ना. जोश्यांच्याच भाषेत त्यांच्या आक्षेपाला उत्तर देता येईल— " पण शिवरायाची अर्धा वाटा मागण्याची गोष्ट मात्र समर्थित होणे कठिण ... पण हा सूर्यावरील डाग आहे. नेता आणि कलावान यांच्या राजनैतिक चारित्र्याकडे पहावयाचे असते. कौटुंबिक किंवा वैयक्तिक गुणावगुणांकडे पाहून त्यांची थोरवी ठरवावयाची नसते. " ( महाराष्ट्रेतिहासकालातील राज्यकारभाराचा अभ्यास भाग १, पृ. ११५–१६ ) शिवाजी–व्यंकोजी यांच्या पत्राकडे टिकेकर केवळ कौटुंबिक दृष्टीने पाहतात तीच मुळात चूक आहे. त्यातील राजकारणी बाजू ही मुख्य व जास्त महत्त्वाची आहे. खुद्द टिकेकरांनीच म्हटले आहे की महाराज व व्यंकोजी दोघेही स्वतंत्र राज्य करणारे छत्रपति असून त्या दृष्टीने त्यांच्या संबंधाकडे पाहिले पाहिजे. मग महाराज तरी व्यंकोजीकडून कसली अपेक्षा करीत होते ? आपण महाराष्ट्रात कर्तबगारी गाजविली तशी कर्तबगारी व्यंकोजीने दक्षिणेत गाजवून मुसलमान व इतर शत्रूंचा नायनाट करावा व ' छत्रपति 'पद मिळविल्याने सार्थक करावे, हीच महाराजांची इच्छा होती. ती पुरी करणे दूरच राहून व्यंकोजी आदिलशहाच्याच कच्छपी लागला हे त्यांस मुळीच सहन होणे शक्य नव्हते. त्यामुळेच महाराजांनी महाराष्ट्रातील वडिलोपार्जित जहागिरीच्या वाट्याची भाषा तर काढली नाहीच उलट व्यंकोजीच्या कर्नाटकातील जहागिरीचा काही भाग त्याच्यासाठी व त्याच्या कुटुंबियांसाठी ठेवून बाकीचा सर्व जिंकून घेतला. यावरून राज्यहितापुढे, वैयक्तिक अन्याय क्वचित् झाल्यास त्याची व नात्यागोत्याची पर्वा न करणारे महाराज होते याबद्दल शंका उरत नाही. अर्थात् त्यांस दोष मुळीच देतां येणार नाही.

कै. सर यदुनाथ व कै. शं. ना. जोशी या थोर इतिहासकारांनी पारसनीससंपादित महाराज-व्यंकोजी संबंधाबाबतची सर्व पत्रे अविश्वसनीय ठरविली आहेत, हा टिकेकरांचा एक मुद्दा आहे. सर यदुनाथ हे एरवी कितीही मोठे संशोधक असले तरी मराठी भाषेचे त्यांचे ज्ञान तुटपुंजे असल्याने मराठी पत्रातील भाषेचा व माहितीचा बारकावा त्यास समजणे शक्य नव्हते. मराठी साधनांबाबत त्यांचा दृष्टिकोन विरोधी पक्षपाताचा व पूर्वग्रहदूषित होता हे तर सुप्रसिद्धच आहे. आज्ञापत्र, शिवभारत, जेधे शकावली इत्यादींचे महत्त्व ज्यांनी कमी लेखले ( शेवटच्या दोघांचा उपयोग करूनही ) व फारसी तवारिखा मात्र जास्त विश्वसनीय ठरविल्या त्यांचे मत शिवाजी-व्यंकोजी संबंधाबद्दलच्या पत्रांबाबत मुळीच ग्राह्य धरण्याजोगे नाही. कै. शं. ना. जोशी यानी ही पत्रे पूर्णपणे अविश्वसनीय ठरविली आहेत हे टिकेकरांचे म्हणणे मात्र साफ चूक आहे. ही पत्रे जशी छापली आहेत तशी न वाचता त्यात योग्य तो बदल करून त्यातील ग्राह्यांश घेतला पाहिजे असे सांगून जोश्यांनी त्यापैकी एका पत्राच्या ' राजकारणी बाजू'ची व शिवाजी-व्यंकोजी संबंधांची चर्चा केली आहे ( म. राज्यकारभाराचा इ. भाग १, पृ. १०६-१२२ ). महत्त्वाची गोष्ट म्हणजे ' शिवदिग्विजय बखरीत ' व ' तंजावरचे राजघराणे ' या ग्रंथात दिलेल्या शिवाजी-व्यंकोजी तहतीलही मुख्य गाभा खरा मानून, "त्यांतील १२ व्या कलमात शिवाजीराजांच्याच काय ? पण पावणेदोनशे वर्षे चाललेल्या महाराष्ट्रराज्याच्या व साम्राज्याच्या इतिहासातील एक महान् तत्त्व सांगणारे प्रबोधक सूत्र " आले असल्याचे जोश्यांनी प्रतिपादिले आहे ( म. राज्यकारभाराचा इ. भाग १, पृ. १११ ). तरी देखील जोश्यांनी पारसनिसांची पत्रे अविश्वसनीय ठरविल्याचे टिकेकर सरळ ठोकून देतात!! कै. जोश्यांच्या वरील ग्रंथातील प्रकरण ४ थे (पृ. १०६-१२२) टिकेकरांनी लक्षपूर्वक वाचावे अशी त्यास विनंति आहे.

शेजवलकरांच्या संकल्पित शिवचरित्रग्रंथाच्या अथांग महासागरात टिकेकरांनी बुडी मारली; पण शिवचरित्रकार व ग्रंथसंकलनकार यांच्या भूमिका नीट समजावून घेणे त्यांना मुळीच न जमल्याने, महासागराचा तळ गाठण्याऐवजी ते वरवरच हातपाय हालवीत राहिले. साहजिकच वाचकांना देण्यासाठी त्यांच्या हाती रत्ने लागली ती अगदीच थोडी; बहुतेक गवसल्या त्या कवड्या आणि शंखच !!

---








## वाचकांचा पत्रव्यवहार --

### ' ढवळे, ' व ' मराठी संशोधक '

श्री. संपादक " नवभारत ",

सा. न. वि. वि.

आपल्या मासिकाच्या ऑक्टोबर १९६५ च्या अंकात प्रा. वि. म. बेडेकर यांचा " डॉ. परशुराम लक्ष्मण वैद्य " हा व्यक्तित्वदर्शक लेख आला आहे. त्यात प्रो. प. ल. वैद्य यांच्या ' ढवळे ' - विषयक मतांचा उल्लेख करताना लेखक म्हणतात :

" काही मराठी संशोधकांनी ' ढवळे ' या गीत प्रकाराची व्युत्पत्ति ' धव+ल ' अशी लावली असून त्याचा अर्थ लग्नात गावयाचे वरविषयक गीत असा केला आहे. हा अर्थ कसा चुकीचा आहे हे डॉ. वैद्य यांनी दाखवून दिले आहे. अपभ्रंश-वाङ्मयात ' धवल ' नावाचे लोकगीत वृत्त असून त्या वृत्तात अपभ्रंश भाषेत बरीच काव्यरचना आहे ... ... " ( " नवभारत, " ऑक्टो० ६५ पृ. ५० ) या संबंधात प्रो. वैद्य व प्रो. बेडेकर या दोघांनीही ( वरील विधानातील मत खरे असेल तर ) ' मराठी संशोधकां 'ना न्याय दिलेला नाही असे म्हणावे लागते. कसा तो पाहा :

सुप्रसिद्ध अपभ्रंशभाषाचार्य हेमचंद्र याने ' छंदोनुशासना 'त ' धवल ' ' छंद ' वर्णिताना तो आठ, सहा, चार चरणांचा असा विविध असतो असे म्हटले आहे ( धवलमष्टषट्चतुष्पादात् ॥ ५.३२ ॥ ) पुढे लगेच या सूत्राचे विवरण करताना हेमचंद्राचार्य म्हणतात :

धवलनिहेण सुपुरिसो वण्णिज्जइ जेण तेण सो धवलो। ( ५.३२:१ ) यात ' सुपुरिसो ' ( पाठांतर सुउरिसो ) असे पद आहे त्याचा अर्थ परमेश्वर व लौकिकार्थाने ' वर-राजा ' ( तोच ' उत्तम पुरुष ' मानलेला असल्यामुळे ) असा अर्थ अपेक्षित आहे.

गुजराती छंदोविचारक ( उदा. स्व. रामनारायणभाई पाठक " प्राचीन गुजराती, छंदो ", पृ ३५२ ) असे मानतात की ज्या गीतात धवल(वर) म्हणून पुरुषाची स्तुति केली जाते ते गीत धवल होय. ( गुजरातीत धोळ, धूल, धउल वगैरे रूपे आढळतात). गुजरातेत हेमचंद्राचार्यांचे वास्तव्य होते. व त्या प्रांतातच ' धोळ ' नामक गीते विवाहप्रसंगी म्हटली जातात. ' धोळ ' हे ' धवल-धउल ' यावरून बनलेले रूप आहे असे तेथील छंदोविशारद मानतात. मराठीत जे जुने ' ढवळे ' उपलब्ध झाले आहेत त्यांचा उपक्रम श्रीकृष्णविवाहोत्सवाच्या प्रसंगानेच झालेला आहे. एकनाथ-दासोपंतांचे ' ढवळ्यां 'चे उल्लेख विवाहांतील ' हळदुली 'च्या वेळचे म्हणून आलेले आहेत.

सोमेश्वराच्या " मानसोल्लासा "त ' विवाहे धवले तथा ' असा संदर्भ या छंदाचा आलेला आहे. ' संगीत-रत्नाकरा'त अनेक वेगवेगळ्या रचनांच्या ' धवल ' रचनांचा उल्लेख आहे.

हेमचंद्राने यांचे श्रीधवल, यशोधवल, कीर्तिधवल, गुणधवल, भ्रमरधवल, अमरधवल, असे पोटभेद दिले असून त्यात उत्साह, हेला, वदन, अडिला हे विशिष्ट छंद या व्यापक ' छंद ' प्रकारासाठी वापरतात असे नमूद केले आहे, ( पंचम अध्याय, सूत्र ४०, ४०·१,) आणि पुढे म्हटले आहे :

उत्साहादिना येनैव धवलमंगलभाषागाने
तन्नामाद्ये धवलमंगले ॥ – अ. ५।४०
उत्साहहेलावदनाडिलाद्यैः
यद् गीयते मंगलवाचि किंचित् ॥ अ. ५।४०·१

तैरेव धवलव्याजात् पुरुषः स्तूयते यदा ।
तद्वदेव तदानेको धवलोऽप्यभिधीयते ॥
– अ. ५।४०·२

या संस्कृत विवृत्तीचा अर्थ आताच दिलेल्या अपभ्रंश विवृत्तिसारखाच आहे. यातही ' पुरुष ' याचा अर्थ ' सुपुरुष ' – वरराजा असा करावयाचा असे बहुतेक सर्व अभ्यासक मानतात.

मी सन १९५५ साली प्रसिद्ध केलेल्या " मराठी छंदोरचना " ग्रंथात याचे सविस्तर विवेचन केलेले आहे. प्रो. प. ल. वैद्य यांची पुस्तकातील व्याख्याने सन १९४४ साली ( प्रसिद्ध ? ) झाली. पण प्रा. वि.










म. बेडेकर यांचा लेख सन १९६५ साली प्रसिद्ध झाला आहे ! त्यांना ' समग्र ग्रंथ पाहिल्या-वाचल्याविणें ' वगैरे श्रुतोक्ती परिचित असेलच म्हणून अधिक प्रपंच करीत नाही.

' छंद ' या पदाचा अर्थ या अपभ्रंशछंदाबद्दलच्या ग्रंथात लोकगीतातील रचनाप्रकार असा व्यापक असतो. ते एकच एक ' लोकगीत वृत्त ' नसते व कदाचित प्रा. प. ल. वैद्य यांना तसा अर्थ अभिप्रेत नसेलही; पण माझ्यापुढे प्रा. प. ल. वैद्यांचा ग्रंथ नसल्यामुळे व प्रा. बेडेकर यांनी मुळातील अवतरण दिले नसल्यामुळे या बाबतीत निश्चित मत देता येत नाही.

थोडक्यात निष्कर्ष असा की धवलगीत म्हणजे विवाहप्रसंगी गावयाचे गीत हा अर्थ मराठी संशोधकानी स्वकपोलातून कल्पिलेला नाही. त्या अर्थाला अपभ्रंशकाळातील, व गुजराती मराठी संदर्भातील पुरेसा आधार आहे. मराठीतील उपलब्ध धवळे तर उत्साहादि छंदातही नाहीत, एवढेच नव्हे तर त्यातील छंदाचा पत्ता अनेक मराठी संशोधकांना लागत नाही व मलाही संपूर्णपणे लागला आहे असा दावा मी करीत नाही. प्रा. द. रा. बेंद्रे यांना त्यातील छंद कानडीतील ' अक्कर ' नामक अक्षरछंदासारखा वाटतो, श्री. वा. ना. देशपांडे यांना त्यांत ' मुक्त ओवी आढळते, तर मला त्यांत विलंबितोच्चारी छांदस रचना प्रतीत होते. मूळ गीते गावयाची पद्धति आज रूढ नसल्यामुळे ही सगळी अनुमाने लंगडीच मानावी लागतील ! एक दुसऱ्यापेक्षा कमी जास्त लंगडे एवढेच तारतम्य शक्य आहे. परंतु ' मराठी संशोधक ' यात ' चुकले ' असे न्यायाने म्हणता येणार नाही.

– ना. ग. जोशी










# सार--संकलन

## माओचे स्वप्न

पेकिंगमध्ये प्रसिद्ध झालेला अलीकडचा (२ सप्टेंबर १९६५) एक लेख तज्ज्ञांच्या मते अत्यंत महत्त्वाचा गणला गेला आहे. त्यातील बऱ्याचशा कल्पना व सिद्धांत जुनेच आहेत; तथापि त्या लेखाचे महत्त्व मात्र हिटलरच्या "मैन् काम्फ" या ग्रंथाइतकेच समजले जाते. माओचा जगाविषयीचा दृष्टिकोण त्यात व्यक्त झाला आहे. पेकिंगच्या दृष्टीने जगाची कशी मांडणी करता येईल याचे हे पहिलेच स्पष्ट व तात्त्विक स्वरूपाचे विवेचन होय. कम्युनिस्ट पक्षाच्या मध्यवर्ती समितीचे उपप्रमुख, उपपंतप्रधान आणि संरक्षणमंत्री लिन् प्याओ यानी हा लेख लिहिला आहे; तथापि तो वास्तविकपणे स्वतः माओचाच असावा असा तज्ज्ञांचा कयास आहे. या लेखाचा येथे प्रथम थोडक्यात सारांश देत आहोतः

"साम्राज्यशाही आक्रमणाशी मुकाबला करण्याचा प्रसंग आला की कम्युनिस्ट पक्षाला राष्ट्रीय निशाण हाती घ्यावे लागते असा इतिहासाचा दाखला आहे. हे निशाण उंच धरून, संयुक्त आघाडीचे साधन वापरून, देशातील नव्वद टक्के साम्राज्यशाहीविरोधी देशभक्त प्रजेला स्वतःभोवती एकत्र करणे आवश्यक ठरते. एकत्र आणता येण्यासारख्या सर्व शक्तींना एकत्र आणून राष्ट्राच्या सामान्य शत्रूला एकाकी पाडण्याचा प्रयत्न करणे जरूरीचे ठरते. उलट राष्ट्रीय निशाण बाजूस ठेवल्यास, आपल्या पक्षाचीं द्वारे बंद करून एकांडी शिलेदारी करायची म्हटल्यास कम्युनिस्टांना नेतृत्व करता येणार नाही आणि जनतेचा क्रांतिकारक उठाव करता येणार नाही. एका परीने हा मार्ग म्हणजे शत्रूला मदत करण्याचा व स्वतः पराभव पत्करण्याचाच मार्ग होय.

संयुक्त आघाडीत सामील होताना कम्युनिस्ट पक्षाने मात्र आपले वैचारिक, राजकीय व संघटनात्मक स्वातंत्र्य अबाधित राखले पाहिजे, या स्वतंत्र भूमिकेचा आग्रह धरला पाहिजे व पुढाकार घेण्याचे व नेतृत्व करण्याचे आपले स्थान कायम राखले पाहिजे असाही इतिहासाचा निर्वाळा आहे.

राष्ट्रीय-लोकशाही क्रांतीमध्ये दोन निरनिराळ्या आघाड्या आढळतात. एक, कामगार-किसान आघाडी; आणि दुसरी, या आघाडीची भांडवलदार वा (मध्यम) अन्य, कामगार व्यतिरिक्त, वर्गाशी होणारी युती. कामगार-किसान आघाडी हा संयुक्त आघाडीचा पाया आहे. कामगार वर्गाचे शेतकरी व अन्य श्रमिक वर्गांना एकत्र आणण्याचे सामर्थ्य हा या राष्ट्रीयलोकशाही क्रांतीतील कामगारांच्या नेतृत्वाचा खरा आधार आहे. कामगार वर्गाचे नेतृत्व आणि कामगार-किसान आघाडी यावाचून दुसरी आघाडी मुळी उभीच राहू शकणार नाही. व्यापक संयुक्त आघाडी व जनतेचे यशस्वी युद्ध ही अशक्यच होतील. कामगार नेतृत्व आणि कामगार-किसान आघाडी यावाचून साराच कारभार बिनभरवशाचा होईल. क्रांती म्हणजे हवेत मनोरे रचणे किंवा नुसत्या पोकळ गप्पा असे म्हणावे लागेल.

चिनी क्रांती हे रशियन क्रांतीचेच (ऑक्टोबर रिव्होलुशन) पुढचे पाऊल आहे. ऑक्टोबर क्रांतीचा मार्ग हाच सर्व जनताक्रांतीचा मार्ग आहे. या दोन क्रांत्यांमध्ये महत्वाच्या सामान्य गोष्टींचा प्रत्यय येतो : (१) दोन्ही क्रांत्यांचे नेतृत्व कामगारवर्गानेच केले; आणि त्यात मार्क्स-लेनिनवादी पक्षच आघाडीवर होता; (२) दोन्हीत राज्यसत्ता हिंसात्मक क्रांतीच्या योगाने हस्तगत करण्यात येऊन कामगार हुकमतीची स्थापना करण्यात आली. (३) क्रांती यशस्वी झाल्यानंतरच दोन्ही ठिकाणी समाजवादाची स्थापना झाली; (४) दोन्ही क्रांत्या या जागतिक कामगार क्रांतीचाच भाग होत.

अर्थात् त्यांची स्वतंत्र वैशिष्ट्येही होतीच. रशियन क्रांती ही साम्राज्यशाही रशियात झाली, तर चिनी क्रांती ही अर्धवट सरंजामशाही, व वसाहतवादाचे भक्ष्य बनलेल्या समाजात झाली. पहिली ही कामगार वर्गाची समाजवादी क्रांती होती तर दुसरीला लोकशाही क्रांतीला पूर्ण यश मिळाल्यानंतरच ते स्वरूप आले. ऑक्टोबर क्रांतीला शहरातील सशस्त्र उठावाने आरंभ होऊन नंतर ती खेडोपाडी पसरली; उलट चिनी क्रांती



अनुक्रमणिका






यशस्वी होण्याचे कारण शहरांना खेड्यांनी वेढून टाकले व अखेरीस काबीज केले हे आहे.

कॉम्रेड माओत्सेतुंगचा जनतायुद्धाचा सिद्धांत हा चिनी क्रांतीच्या दीर्घकालीन अनुभवाने सिद्ध झाला आहे. अशा युद्धाच्या व क्रांत्यांच्या वस्तुनिष्ठ नियमांशी तो सुसंगत आहे; आणि म्हणून अजिंक्य आहे. तो केवळ चीनलाच लागू पडणारा सिद्धांत नाही; जगातील सर्व दडपल्या गेलेल्या राष्ट्रांच्या व जनतेच्या क्रांतिकारी लढ्यांनाही तो लागू पडतो.

कामगार–क्रांतीचा मार्क्स–लेनिनवादी सिद्धांत हा क्रांतिवादी शक्तींनी, हिंसात्मक मार्गांनी राज्यसत्ता हिरावून घेण्याचाच सिद्धांत आहे. जनता विरोधी युद्धाला जनतेच्या युद्धाने प्रतिकार करण्याची कल्पना त्यात आहे. जुन्या समाजव्यवस्थेतून नवी जन्माला येण्याचे हिंसा हेच साधन होय, हे मार्क्सनेच म्हटले आहे. चिनी क्रांतीच्या प्रदीर्घ अनुभवातूनच माओनेही आपला, "राजकीय सत्ता ही बंदुकीच्या नळीतूनच वाढत असते," हा सिद्धांत मांडला आहे. लष्करी सामर्थ्याच्या आधारे राज्यसत्ता काबीज करणे, युद्धाच्या आधारानेच प्रश्न सोडवणे हे क्रांतीचे मध्यवर्ती कार्य. तोच क्रांतीचा परमोच्च बिंदू. क्रांतीचे हे मार्क्स-लेनिन प्रणीत तत्त्व सर्वत्र सारखेच लागू पडणारे आहे.

आज अनेक दडपल्या गेलेल्या राष्ट्रांचे व जनतेचे क्रांतिकारी लढे सुरू आहेत; विशेषतः आशिया, आफ्रिका, लॅटिन अमेरिका या खंडातील जनता साम्राज्यशाही व तिच्या हस्तकांविरुद्ध लढत आहे. या सर्वांना प्रत्यक्ष व्यवहारात उपयुक्त वाटेल असा सर्वात महत्वाचा सिद्धांत म्हणजे माओचा सिद्धांत होय. ग्रामीण भागात क्रांतिकारक तळ स्थापन करायचे व तेथून शहरांना वेढा घालून ती काबीज करायची हा माओचा सिद्धांत अत्यंत मौलिक स्वरूपाचाच म्हटला पाहिजे.

सर्व जगाचा विचार करायचा म्हटल्यास उत्तर अमेरिका व पश्चिम युरोप ही जगातील शहरे म्हणता येतील; उलट, आशिया, आफ्रिका व लॅटिन अमेरिका हा ग्रामीण भाग होय. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळात उत्तर अमेरिका व पश्चिम युरोपमध्ये अनेक कारणास्तव कामगार आंदोलनाने विशेष प्रगति केल्याचे दिसत नाही. उलट, आशिया, आफ्रिका व लॅटिन अमेरिका या खंडातील जनतेचे क्रांतिवादी लढे मात्र सतत वाढत आहेत. एका अर्थाने आजचे जागतिक दृश्य हेही शहरांना ग्रामीण भागांनी वेढा घातल्याचेच दृश्य आहे. अंतिम अर्थाने बोलायचे झाल्यास जागतिक क्रांतीचे सारे भवितव्य आशिया, आफ्रिका, व लॅटिन अमेरिका खंडातील क्रांतीवर अवलंबून आहे; कारण, जगातील बहुसंख्य लोक येथे आहेत. यामुळे या लढ्यांना संपूर्ण पाठिंबा देणे हे समाजवादी राष्ट्रांनी आपले महत्त्वाचे आंतरराष्ट्रीय कर्तव्य समजले पाहिजे. माओने लोकशाही क्रांतीचे संपूर्ण तत्वज्ञान निर्माण केले आहे. बहुसंख्य जनतेने कामगार नेतृत्वाखाली साम्राज्यशाही, सरंजामशाही व नोकरशाही–भांडवलशाही (ब्युरोक्रॅटिक कॅपिटॅलिझम) याच्याविरुद्ध ही क्रांती करायची आहे. कामगारवर्ग आणि मार्क्स-लेनिनवादी क्रांतिकारी पक्ष यांनीच तिचे नेतृत्व केले पाहिजे; अन्य कोणीही नव्हे. सातत्याने सुरू राहाणाऱ्या क्रांतीचा हा माओप्रणीत सिद्धांत आहे.

क्रांतीच्या दोन अवस्थांमध्ये माओने फरक केला आहे; तसेच त्यांचा संबंधही त्याने स्पष्ट केला आहे. राष्ट्रीय लोकशाही क्रांती ही समाजवादी क्रांतीची आवश्यक पूर्वतयारी आहे; समाजवादी क्रांती हा राष्ट्रीय–लोकशाही क्रांतीचा अपरिहार्य परिणाम आहे. या दोन क्रांत्यांमध्ये कोणताही अडथळा किंवा भिंत नाही. राष्ट्रीय–लोकशाही क्रांतीचे कार्य पुरे होण्यासाठी अनेक लढे द्यावे लागतात. क्रांतीच्या या अवस्थेत साम्राज्यशाही व तिचे हस्तक यांच्याशीच खरा लढा द्यायचा असतो. या लढ्यात राष्ट्रीय–भांडवलदार व देशप्रेमाने भारलेल्या गटांसहित सर्वांची एकजूट करायची असते; सर्व साम्राज्यशाहीविरोधी शक्ती एकत्र आणणे आवश्यक असते. साम्राज्यशाही-विरुद्ध लढा देण्यास उद्युक्त झालेल्या या शक्ती एका परीने ऐतिहासिक दृष्ट्या प्रगमनशील कार्य करीत असतात. साम्राज्यशाही त्याचे अस्तित्व सहन करू शकत नाही; तथापि कामगारवर्गाने त्याचे स्वागतच केले पाहिजे.

क्रांतीच्या या दोन अवस्थांची गल्लत करता कामा नये. तसेच या दोन्ही क्रांत्या एकदमच करता येतील










असे समजणेही चूक आहे. त्यामुळे साम्राज्यशाही व तिच्या हस्तकांविरुद्ध लढा दुर्बल होईल अशी माओने स्पष्ट ताकीद दिली आहे. कॉमिंटांगचे प्रतिक्रांतिकारक व युद्धकाळात त्यानी सहकार्य घेतलेले ट्रॉट्स्कीवादी यानी मुद्दाम अशी गल्लत केली; एकाच क्रांतीचा सिद्धांत सांगितला, व कम्युनिस्ट पक्षास बाजूस सारून समाजवादाचा प्रचार सुरू केला. या सिद्धांताच्या सहाय्याने कम्युनिस्ट पक्ष नामोहरम करण्याचा, क्रांती नेस्तनाबूत करण्याचा व राष्ट्रीय-लोकशाही क्रांतीची प्रगती रोखण्याचा त्यांचा उद्देश होता. साम्राज्यशाहीला होणारा विरोध दुबळा करण्यासाठी त्यांनी हा सिद्धांत वापरला. चिनी क्रांतीच्या इतिहासात तो आता गाडला गेला आहे.

आक्रमणाची शिकार बनलेले राष्ट्र जनतायुद्धाच्या तंत्राचा वापर करून अमेरिकन साम्राज्यशाहीला कसे पराभूत करू शकते याचे विएटनाम हे एक उत्तम चालू उदाहरण आहे. जनतायुद्ध दडपून टाकण्यासाठी अमेरिकेने दक्षिण विएटनाम ही प्रयोगभूमी बनवली आहे. तथापि हा प्रयोग कित्येक वर्षे चालून देखील त्यात यशाची आशा दिसत नाही. उलट आक्रमकांनाच पराभवाची भीती वाटत आहे. यामुळे ते युद्धाची व्याप्ती वाढवीत आहेत. तथापि त्यामुळे पराभव अधिक मोठा होईल इतकेच. जगाच्या इतर भागातील लोकांना अमेरिकन साम्राज्यशाहीचा पराभव होऊ शकतो हे दिसून येईल. विएटनामी जनता जे करू शकते ते आपणही करू शकू असा आत्मविश्वास त्याना वाटू लागेल. अमेरिकन साम्राज्यशाही व तिचे हस्तक यांच्याविरुद्ध लढण्याचे जनतायुद्ध हेच प्रभावी साधन आहे ही गोष्ट दिवसेदिवस अधिकाधिक प्रत्ययास आल्यावाचून राहाणार नाही.

" सत्ताधीशांना घरे जाळण्याची देखील मुभा आहे; सामान्य माणसांना मात्र दिवा लावायची देखील परवानगी नाही " अशी एक म्हण आहे. साम्राज्यशाहीचा हाच मार्ग आहे. याच मार्गाचा अनुनय करून क्रुश्चेव्हचे परिवर्तनवादी अनुयायी जागतिक शांततेच्या लढ्यात आघाडीवर उभे असलेल्या चिनी जनतेला " तुम्ही युद्धपिपासू आहात " असे म्हणतात. तथापि ही शिवी आम्हाला भूषणावहच वाटते. आमच्या या ' युद्धपिपासू ' वृत्तीनेच साम्राज्यशाहीला जागतिक युद्धापासून परावृत्त केले आहे. जनतेला आपले संरक्षण करायचे आहे. साम्राज्यशाही जनतेला संरक्षण करावयास भाग पाडीत आहे. म्हणूनच जनता लढाऊ वृत्तीची होत आहे. युद्धाचे तंत्र जनतेला साम्राज्यशाहीनेच शिकवले आहे. प्रतिक्रांतिवादी लढाऊपणाशी मुकाबला करण्यासाठी जनता क्रांतिवादी लढाऊपणा दाखवीत आहे इतकेच ! साम्राज्यशाहीने लोकांची हत्या करावी, लोकांनी मात्र प्रतिकार करता कामा नये असे कसे म्हणता येईल ? हे कोठले तर्कशास्त्र ? क्रुश्चेव्हवाद्यांचे सत्यस्वरूप त्यायोगे स्पष्ट झाले आहे. युद्धामुळे विध्वंस होतो, जनतेला त्याग व हालअपेष्टा सहन कराव्या लागतात हे आम्ही जाणतो. परंतु साम्राज्यशाहीचा प्रतिकार न केल्यास, जनतेने खुशीने दास्य पत्करल्यास हे सर्व कितीतरी पटींनी अधिक सहन करावे लागेल. म्हणून मूठभर लोकांच्या त्यागाला इतके महत्त्व देण्याची गरज नाही; त्यायोगाने सर्व राष्ट्राचे स्थैर्य मजबूत होईल. युद्ध लोकांना तयार करील, इतिहासाचा क्रम पुढे नेईल. एका अर्थी, युद्ध ही एक मोठी शाळाच आहे.

पहिल्या महायुद्धाविषयी बोलताना लेनिन म्हणाला : " अत्यंत पुढारलेल्या व सुसंस्कृत देशात युद्धाने उपासमार आणली खरी. पण त्याबरोबरच प्रचंड ऐतिहासिक क्रम म्हणून युद्धाने सामाजिक विकासाच्या गतीत अपूर्व वाढ केली आहे. युद्ध, तज्जन्य त्याग व हालअपेष्टा यांनी जनतेला जागृत केले आहे; इतिहासाची गती वाढवली आहे. " क्रुश्चेव्हवाद्यांचे म्हणणे मान्य केल्यास लेनिनला अत्यंत मोठा युद्धपिपासू म्हणावे लागेल. उलट मार्क्सलेनिनवादी क्रांतिकारक जनतेने युद्धाची कधीच पर्वा केली नाही असे दिसते. साम्राज्यशाहीच्या आक्रमक युद्धाविषयी आमचा दृष्टिकोण अगदी स्पष्ट आहे. एकतर आम्ही त्यांच्याविरुद्ध आहोत; आणि दुसरे म्हणजे आम्ही त्यांना भीत नाही.

आमच्यावर कोणी हल्ला केल्यास आम्ही त्याला नष्ट करू, दडपल्या गेलेल्या राष्ट्रांनी व जनतेने क्रांतिकारक युद्धे सुरू केल्यास आम्ही त्यांचा विरोध करण्याऐवजी त्यांना सतत पाठिंबा देत राहू व प्रत्यक्ष साहाय्यही करू. गतकाळात आम्ही हेच धोरण ठेवले;












आजही तेच कायम आहे; आणि भावी काळात आमचे सामर्थ्य वाढले म्हणजे आम्ही कितीतरी अधिक प्रमाणात त्याचाच पाठपुरावा करीत राहू. आमची क्रांती यशस्वी झाली आहे, राष्ट्रीय पुनर्रचनेचे काम पुढे जात आहे, लोकांचे आरोग्य सुधारत आहे, राहाणीचे मान उंचावत आहे. तथापि त्यामुळे आम्ही आता क्रांतीची गरज विसरून जाऊ, मार्क्स-लेनिनवाद आणि कामगारांची आंतरराष्ट्रीयत्वाची भूमिका सोडून देऊ असा कोणाचा समज असल्यास ते एक दिवास्वप्नच ठरेल.

अर्थात् प्रत्येक क्रांती ही त्या त्या देशातील लोकांच्या मागणीतूनच होत असते. लोकांना जागृत व संघटित करावे व शस्त्रास्त्रे द्यावीत तेव्हाच ते लढा करतात व साम्राज्यशाहीची व तिच्या हस्तकांची प्रतिगामी सत्ता झुगारून देतात. हे कार्य बाहेरील जनता करू शकणार नाही. क्रांती आयात करता येत नाही हे म्हणणे एका अर्थी खरेच आहे. परंतु देशोदेशींच्या क्रांतिकारक जनतेत सहानुभूतीची व परस्पर साहाय्याची भावना असणार नाही असा याचा अर्थ नव्हे. क्रुश्चेव्हवाद्यांनी या क्रांतिकारक जनतेला पराभूत वृत्तीच्या व शरणागतीच्या गोष्टी सांगून तिचा तेजोभंग केला आहे. त्यांच्या प्रचारामुळे अमेरिकन साम्राज्यशाहीला उत्तेजन मिळाले आहे. मार्क्स-लेनिनवादाशी त्यांनी संपूर्ण प्रतारणा केली असून जनतेच्या युद्धाशी द्रोह केला आहे. हे युद्ध यशस्वी होण्यासाठी त्यांच्याशी मुकाबला करावा लागेल. क्रुश्चेव्ह संपला, पण त्याच्या नंतर पुढे आलेले सत्ताधीश तितकेच साम्राज्यवादी, प्रतिगामी व जनतायुद्धाचे दुश्मन आहेत. क्रांतिकारक जनतेच्या उठावापुढे ते कचऱ्याप्रमाणे उडून जातील यात शंका नाही.

जनतेला आता भरपूर अनुभव मिळाला आहे. ऑक्टोबर क्रांती, फॅसिस्टविरोधी युद्ध, चिनी जनतेचा प्रतिकारात्मक लढा व स्वातंत्र्य युद्ध, कोरियन जनतेने केलेला अमेरिकन साम्राज्यशाहीचा प्रतिकार, आणि इतर अनेक प्रतिकारात्मक क्रांतिकारक लढे, या सर्वांचा अनुभव तिने आता घेतला आहे. या सर्व लढ्यांचा योग्य बोध प्रत्येक देशातील जनतेने घ्यावा आणि आपापल्या विशिष्ट परिस्थितीतील क्रांतिकारक अनुभवांशी त्याची जुळणी करावी. असे झाल्यास जगातील क्रांतिवादी जनता आजच्यापेक्षा कितीतरी मोठे व नाट्यमय विजय मिळवल्यावाचून राहणार नाही, असा विश्वास वाटतो. लोकयुद्धाचे सामान्य दुश्मन जे अमेरिकन साम्राज्यशाही व तिचे हस्तक यांचा या वाढत्या झंझावातात संपूर्ण विनाश अटळ आहे. विएटनाममधील युद्ध हे जागतिक लोक-युद्धाचे केंद्र आहे आणि तेथे लढत असलेल्या जनतेला साहाय्य करण्याचा चिनी जनतेने निर्धार केला आहे. हे साहाय्य आम्ही सर्वतोपरी करूच करू !"

आशिया, आफ्रिका व लॅटिन अमेरिका येथील लोकयुद्धाला साहाय्य करण्याची कल्पना ही या लेखातील एक महत्त्वाची कल्पना आहे. या कल्पनेच्या अनुषंगाने या लेखावर भाष्य करताना "वॉशिंग्टन पोस्ट"चा प्रतिनिधी रॉबर्ट चामर्स म्हणतो : "या भूभागातील सर्व लढे चीनच्या मते क्रांत्या किंवा राष्ट्रीय विमोचनाच्या लढाया होत. इतरत्र त्यांचा बंड म्हणून उल्लेख होतो. या लढ्यांना उत्तेजन देऊन मागस राष्ट्रांना एकामागून एक आपल्या वर्चस्वाखाली आणणे व पाश्चात्य राष्ट्रांचे तेथील वजन नाहीसे करणे हा चीनचा खरा हेतू आहे. चिनी सेनेचा उपयोग करून चीनला हे साधावयाचे नाही. गनिमी युद्धाचा अवलंब करून त्या त्या देशातील क्रांतिकारकांनी ते साधावे अशी चीनची कल्पना आहे. या क्रांत्यांनी संयुक्त आघाडीचे राजकारण खेळावे, स्थानिक राष्ट्रवादाचा भरपूर उपयोग करून घ्यावा, असे लिन् पिआओचे म्हणणे. मात्र वर्चस्व नेहमी कम्युनिस्टांचेच असले पाहिजे.

या तंत्राचा व सिद्धांतांचा चीनने अलीकडे भारत-पाकिस्तान युद्धात उपयोग केला आहे. काश्मीरमधील लढा हे "लोकयुद्ध" आहे असे पेकिंगचे म्हणणे. या युद्धात काश्मिरी मुसलमान त्यांच्या हिंदू राज्यकर्त्यांचा प्रतिकार करीत आहेत, त्यांच्याविरुद्ध हे बंड आहे. आता, तेथे असे बंड मुळी झालेच नाही ही वस्तुस्थिती. भारत हे लोकशाही राष्ट्र असल्याने मागासलेल्या राष्ट्रांच्या संदर्भात चीनला ते एक मोठे प्रतिस्पर्धी राष्ट्र वाटते. म्हणून भारताविरुद्ध चीन पाकिस्तानला पाठिंबा देत आहे. त्याचप्रमाणे भारत व पाकिस्तान या दोन्ही देशात आपल्या खऱ्या शत्रूचे म्हणजे








अमेरिका व रशिया यांचे वजन कमी करण्याचा चीनचा प्रयत्न सुरू आहे. चीनने १९६२ साली भारताविरुद्ध सेनेचा वापर केला. पुनः तसा वापर केला जाण्याचा संभव आहे. परंतु भारतावर चढाई केली जाणार नाही. भारत जिंकण्याचा त्यात हेतू नसून भारताचा तेजोभंग करणे हे चीनचे खरे उद्दिष्ट आहे. तथापि सेनेचा वापर करीत असताना अमेरिकन लष्करी सामर्थ्याला मध्ये पडण्यास सबब मिळणार नाही इतपत दक्षता बाळगण्याचा व कलह केवळ वादग्रस्त सीमांपुरताच मर्यादित ठेवण्याचा चीनचा प्रयत्न राहील.

अमेरिकेने जगात अनेक ठिकाणी लक्ष घातले आहे; मोठा घास घेण्याची धडपड केली आहे, सर्वत्र हात पसरून आपले सामर्थ्य विखरून टाकले आहे. हस्तक्षेप दूरदूरच्या प्रदेशात केल्याकारणाने प्रत्येक ठिकाणी कुमक पोहोचवणे तिला जड जात आहे. अमेरिकन साम्राज्यशाही आजवरच्या इतर कोणत्याही साम्राज्यशाहीपेक्षा अधिक बलवान आहे हे खरे. तथापि ते सामर्थ्य विभागले गेले आहे. यामुळे जगात सर्वत्र अमेरिकेचा हात दिसत असला तरी त्या हाताची बोटे एकेक छाटणे सहज शक्य आहे. हा बोटांचा दृष्टान्त माओने कोरियन युद्धाच्या वेळी दिला होता. शहरांना ग्रामीण भागांनी वेढण्याची भाषा गेल्यावर्षी इंडोनेशियात बोलली जात होती; आणि अमेरिका हा "कागदी वाघ" आहे हा माओचा सिद्धान्त तर कित्येक वर्षांमागेच मांडला गेला आहे. असे असताना हे सर्व पुनः एका लेखातून पुढे मांडण्याचा हेतू काय?

काहींचे म्हणणे असे की अमेरिकेने विएटनामला भरपूर साहाय्य देण्याचा उपक्रम आरंभील्यामुळे चीन एकप्रकारे अनिश्चिततेच्या कालखंडात प्रवेश करीत आहे यामुळे अंतर्गत व जागतिक शक्तींच्या मनातील संदेह दूर व्हावा यासाठी हे धोरणविषयक व्यापक निवेदन. यातील लिनने पुनरुच्चार केलेला दीर्घकालीन युद्धाचा सिद्धांत प्रथम, १९३८ साली कम्युनिस्टांची पीछेहाट होत असताना, माओने मांडला होता.

इतर काहींच्या मते अमेरिका खुद्द चीनवरच हल्ला करील अशी शक्यता निर्माण झाल्यामुळे लोकांना पुनः गनिमी युद्धाला तोंड द्यावे लागेल; व त्याकरिता त्यांची तयारी करणे आवश्यक आहे. लिन् म्हणतो : अमेरिकेने हल्ला केल्यास "त्या साम्राज्यशाहीस आम्ही बजावू इच्छितो की ७० कोटी सशस्त्र जनतेचा महासागर येथे आहे; त्यात तुमचे मूठभर सैन्य बुडून जायला काय वेळ लागणार? तुम्ही अधिक सामर्थ्यवान नौदल व हवाई दल यांची शेखी मिरवता; आणि आम्हाला अणुबॉम्बचीही भीती दाखवता. तुम्हाला येथे सैन्य पाठवावयाची खुमखुमी असल्यास जरूर पाठवा. जितके अधिक पाठवाल तितके चांगले. तुम्ही जितके पाठवाल तितके आम्ही खतम करू."

## सागर रोखण्याचे प्रयोग

नदीनाल्यांच्या प्रवाहातून दरवर्षी लक्षावधी गॅलन गोडे पाणी, कसलाही उपयोग न होता, सागरात जाऊन पडते; जमिनीच्या पृष्ठभागाखालूनही अशाच प्रकारे लाखो गॅलन पाणी गलथ्याच्या अनुषंगाने वाहात वाहात समुद्रात जाते हे सर्व प्रसिद्धच आहे.

इस्रायलचा प्रदेश हा एक रखरखित प्रदेश आहे. वाळवंटच म्हटले तरी चालेल. यामुळे तेथे निरनिराळ्या प्रवाहातून समुद्रात जाणारे पाणी शक्य तो नियंत्रित करण्याचे व उपयोगात आणण्याचे प्रयोग सुरू आहेत इस्रायलच्या जलशास्त्रज्ञांनी आता भूपृष्ठाखालून समुद्रात जाऊन पडणारे पाणी रोखण्याचा अत्यंत गुंतागुंतीचा उपक्रम सुरू केला आहे.

या बाबतीत अत्यंत मोठी अडचण आहे. समुद्रकिनाऱ्यावर खड्डा खणून पाहण्याचा उद्योग कधी काळी ज्यांनी केला आहे त्यांच्या हे सहज लक्षात येईल की, विशिष्ट पातळीखाली जाताच असा खड्डा समुद्राच्या पाण्याने भरू लागतो. समुद्रकिनाऱ्यावर काही अंतरापर्यंत समुद्राचे पाणी भूपृष्ठाखालून आत शिरते याचे हे उदाहरण आहे. जमिनीच्या बाजूने गलथ्याच्या दिशेने समुद्राकडे चाललेले भूपृष्ठाखालचे पाणी व समुद्राच्या बाजूने आत शिरणारे खारे पाणी यांना जोडणारा भूभाग कुठेतरी असतो. तो नेमका कुठे असेल याचा नेम नाही. तथापि आत घुसत असलेल्या समुद्राच्या पाण्याला तेथे गोडे पाणी रोखीत असते.

गोड्या पाण्याच्या वाहाणाऱ्या (भूमीच्या) रुंद पट्ट्यातून (वॉटरफ्रंट) म्हणजे गलथ्यातून विशिष्ट मर्यादेपेक्षा अधिक पाण्याचा विहिरींच्या साहाय्याने उपसा झाल्यास हे खारे पाणी आणखी आतमध्ये








सरकते; आणि वॉटरफ्रंट मागे रेटली जाते. उदाहरणार्थ, टेलअव्हीवमध्ये हा अनुभव आला आहे. समुद्रकिनाऱ्यापासून पुष्कळ अंतरावर असलेल्या विहीरींचे पाणी देखील, भरपूर उपसा असल्याने खारे झाले आहे. कारण, समुद्राचे पाणी तेथे शिरले आहे हे होय.

उलट, जमिनीखालून गोडे पाणी समुद्रात फुकट जावे हे कोणीच इष्ट समजणार नाही. इस्रायेलच्या काहाना, नॉर व बेअर या एंजिनियरांनी आता समुद्राचे पाणी भूपृष्ठाखालून पुढे सरकू न देता ऐंशी टक्के वाया जाणारे गोडे पाणी अडविण्याच्या कार्यात यश मिळवले आहे. प्रायोगिक निकष, मॉडेल्स, भूपृष्ठाखालील पाण्याची पाहाणी इत्यादींच्या सहाय्याने कित्येक भागात गोडे पाणी कुठवर आढळते हे त्यांनी निश्चित केले. पाहाणीसाठी कित्येक विहिरी खणल्या, त्यातील पाण्याच्या खारटपणाचे खास रेकॉर्डरच्या साहाय्याने सतत मोजमाप केले. गोडे पाणी बाहेर काढताना, पाण्याच्या पातळीतील बदल, खाऱ्या पाण्याची हालचाल, समुद्र किनाऱ्यापासून विहिरींचे अंतर व त्याचे परिणाम, विहिरींचे एकमेकापासून अंतर, त्यांचा व्यास, खोली इत्यादी इत्यादी घटकांचा आढावा घेतला.

या सर्व प्रयोगांच्या साहाय्याने समुद्रकिनाऱ्यालगत उथळ विहिरींच्या साहाय्याने समुद्रात वाया जाणारे भूपृष्ठाखालील पाणी ऐंशी टक्क्यापर्यंत तरी रोखता येईल असा त्यांचा निष्कर्ष आहे. मात्र त्यासाठी समुद्रात जाणारे पाणी, बाहेर काढल्या जाणाऱ्या पाण्यापेक्षा कमी असता कामा नये. समुद्र किनाऱ्याशी समांतर रेषेत जवळजवळ उथळ विहिरी खणून हे पाणी रोखता येईल. सुमारे ४० ते ७५ मिटर खोल, एकमेकीपासून २०० मिटर अंतरावर आणि समुद्रकिनाऱ्यापासून ३५० ते ५०० मिटर अंतरावर खणलेल्या विहिरीच्या योगाने हा प्रयोग यशस्वीपणे करता आला आहे. आणि त्यामुळे इस्रायेलच्या सर्व किनाऱ्यालगत अशा विहिरी खणण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. नंतर भूमध्यसमुद्राच्या सर्वच किनाऱ्यालगत अशा विहिरी खणणे शक्य होईल अशी अपेक्षा आहे.

– न्यूज फ्रॉम इस्रायेल– ऑक्टोबर १५.

---














अनुक्रमणिका


स्वातंत्र्याची ज्योत
अखंड तेवती राहील
मातृभूमीच्या स्वातंत्र्याचे, एकात्मतेचे व प्रतिष्ठेचे रक्षण करणे हीच तिची सर्वात महान आणि उदात्त सेवा होय !
संचालक, प्रसिद्धी विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई.
शस्त्र दलात दाखल व्हा